वाल्मिकी-आश्रमांतील

# प्रवचनें

: लेखक :

आचार्य जावडेकर

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला
१२ टिळक रोड, पुणें २

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ४१ वें

# वाल्मिकी-आश्रमांतील प्रवचनें

लेखक
आचार्य शं. द. जावडेकर

प्रथमावृत्ति : १९५७ ] [ मूल्य १ रुपया

प्रकाशक
रघुनाथ गणेश जोशी
सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या
विश्वस्त मंडळाकरितां
१२ टिळक रोड, पुणें २

संपादक
आचार्य शं. द. जावडेकर
आचार्य स. ज. भागवत

मुद्रक
स. रा. देशपांडे
लक्ष्मी मुद्रणालय,
८६५ सदाशिव पेठ, पुणें २

## अनुक्रम


| | | |
|---|---|---|
| १ | वाल्मिकीची महती | १ |
| २ | सत्यनिष्ठ बुद्धि | ६ |
| ३ | खरा प्रभु कोण ? | १२ |
| ४ | चोरी आणि काम | १६ |
| ५ | वर्गयुद्ध हेंच धर्मयुद्ध | २३ |
| ६ | सत्याग्रह आणि वर्गयुद्ध | २७ |
| ७ | सत्याग्रहाचा अखंड क्रांतियज्ञ | ३१ |
| ८ | सत्याग्रह, क्रांति आणि समाजधारणा | ३५ |
| ९ | समाजरक्षण आणि समाजक्रांति | ४२ |
| १० | सत्याग्रह आणि समाजवाद | ४६ |
| ११ | सत्याग्रही समाजवाद | ५१ |
| १२ | हिंदी स्वातंत्र्याचा जयजयकार ! | ५६ |

# वाल्मिकीची महती : : प्रवचन १ लें

रामराज्यांत अनेक ऋषी नांदत होते, हीच रामराज्याची खरी महती असें मी मानतों. त्याकाळीं वसिष्ठ होते, विश्वामित्र आणि वाल्मिकीहि होते. आज मी वाल्मिकीच्या मोठेपणासंबंधीं बोलणार आहे. वसिष्ठ, विश्वामित्र आणि वाल्मिकी हे तिघेहि मोठे ऋषी होते; पण प्रत्येकाचें मोठेपण वेगवेगळें होतें. रामचंद्राचें मोठेपण या तिघांहूनहि वेगळें होतें. सीतेचें मोठेपण रामचंद्राच्या मोठेपणाहून भिन्न होतें आणि भरताचें त्याहून-हि निराळें होतें. रामराज्यांत राम, सीता, भरत असे राजघराण्यांतील आदर्श नांदत होते, तसेच वसिष्ठ, विश्वामित्र आणि वाल्मिकी असे आदर्श ऋषी वावरत होते, म्हणूनच त्या रामराज्याची आठवण पांच हजार वर्षें जिवंत आहे. वाल्मिकीनें या रामराज्याचें महत्त्व आमच्या मनावर ठसविलें. पण वाल्मिकी हा केवळ कलेची उपासना करणारा, राजदरबारीं आश्रय मिळवि-णारा कवि नव्हता. रामायणांतील अत्यंत महत्त्वाची अशी सीतेची महती आम्हांला पटवून देण्याचें बहुतेक श्रेय तमसा नदीच्या तीरावर आश्रम बांधून राहिलेल्या वाल्मिकीऋषीला आहे हें आपल्या सहसा लक्षांत येत नाहीं.

## रामाच्या दंडशक्तीची मर्यादा

राम हा एकवचनी, एकबाणी व एकपत्नी म्हणून प्रसिद्ध आहे. रामाचा बाण अमोघ होता. या बाणाच्या बळावर रामचंद्रानें सर्व हिंदुस्थान आपल्या एकछत्री राज्याखालीं आणिलें. लंकेवर स्वारी करून रावणाचा पराभव केला.

सीतेची मुक्तता करून तिला अयोध्येच्या सिंहासनावर आणून बसविलें. चौदा वर्षें वनवास भोगून आल्यानंतर कैकेयीचेंहि हृदय रामासंबंधीं पालटलें, असें कवींनीं वर्णिलें आहे. पण लंकेंतील रावणाचा निःपात करणाऱ्या रामाच्या बाणामध्यें जनतेच्या अंतःकरणांत सीतेच्या चारित्र्यशुद्धीसंबंधीं जो संशयाचा रावण शिरला होता, त्याचा अंत करण्याचें सामर्थ्य नव्हतें. रामाचें मन सीतेसंबंधीं शुद्ध होतें. जनतेच्या मनोदेवतेला सीता अशुध्द वाटत होती. जनतेच्या मनोदेवतेनें तिला अपराधी नसलें, तरी दोषी व त्याज्य ठरविलें होतें. हें जनमत धुडकावून राम सीतेला आपल्या राजवाड्यांत ठेवूं शकला असता. कदाचित् जनतेनें खवळून जाऊन बंड केलें असतें, तर रामानें शस्त्रबलानें तें दडपूनहि टाकिलें असतें. कदाचित् जनता यशस्वी होऊन रामाला तिनें पदच्युतहि केलें असतें. पण एवढ्यानें सीतेचें चारित्र्य शुद्ध आहे अशी जनतेची खात्री झाली नसती. जनतेची मनोदेवता मलिन बनली, तर ती शुद्ध करण्याचें सामर्थ्य राजदंडांत केव्हांच येऊं शकत नाहीं. राजानें आपल्या दंडाचा उपयोग जनतेच्या मनोदेवतेस कौल लावूनच केला पाहिजे, हें लोकशाहीचें तत्त्व आज आपण जाणतों. रामानें सीतेला वनांत नेऊन सोडली, त्याच्या मागें हेंच तत्त्व होतें. राजदंडाच्या सामर्थ्याची ही मर्यादा आजच्या राज्यकर्त्यांनींहि ओळखिली पाहिजे. लोकांची मनोदेवता सांगेल तसाच आपला दंड त्यांनीं वापरला पाहिजे. लोकांना आपलें मत पटविण्याचा प्रयत्न करावा, पण तें पटेपर्यंत लोकमतापुढें वांकूनच राज्यकारभार करावा. कोण दोषी, कोण निर्दोषी हें अखेरीस लोकांना विचारून व पटवून देऊनच राजदंडाचा व्यवहार केला पाहिजे. याच लोकशाहीच्या तत्त्वानुसार रामानें सीतेला निर्वासित केलें. म्हणून त्याला आपण आदर्श राजा मानतों. पण राजधर्मानुसार सीतेला निर्वासित केल्यानंतरहि दुसरी पत्नी न करण्याची तपश्चर्या करून आपण आदर्श पति आहोंत, हेंहि रामानें जगाला दाखवून दिलें.

## लोकगंगेची शुद्धि

यावेळीं सीतेसंबंधीं लोकमताची गंगा गढूळ झालेली होती. ही लोकमताची गंगा शुद्ध करण्याचें सामर्थ्य राजदंडांत नाहीं; पण तें सामर्थ्य

ऋषींच्या आत्मबलांत असूं शकतें हें वाल्मिकीनें सीतेला आश्रमांत आश्रय देऊन जगाला दाखवून दिलें. समाजानें भ्रष्ट ठरविलेली व पतीनें सोडून दिलेली स्त्री पवित्र आणि शुद्ध आहे असें लोकाना पटवून देणें हें कोणाहि सामान्य मनुष्याला शक्य नसतें. तिच्या पोटापाण्याची व्यवस्था करणें किंवा तिचें इतरांपासून संरक्षण करणें या गोष्टी इतक्या कठीण नाहींत. पण तेवढ्यानें सीतेला आज जें पवित्र व पूज्य स्थान प्राप्त झालें आहे, तें पवित्र व पूज्य स्थान प्राप्त होऊं शकलें नसतें. वाल्मिकीसारख्या ऋषीनें आपल्या पवित्र सान्निध्यांत तिला प्रेमानें ठेवून घेतलें, यामुळेंच जनतेची मनोदेवता शांत झाली. राजाच्या जुलुमापासून जनतेला बचावण्यासाठीं लोकशाही राज्यपद्धति निर्माण झाली. ही लोकशाही प्रभावी ठरावी म्हणून भरतखंडांत गांवपंचायतीच्या रूपानें तिचे हजारों वर्षें संरक्षण केलें. पण ही गांवगंगा गढूळ होते व गांवपंचहि गुंड बनतात. या गांवगंगेला शुद्ध ठेवण्यासाठीं काय करावें? पंचांनीं अन्याय केला तर गांवाकडे न्याय मागावा; पण गांवानेंच अन्याय केला तर? गांवाचें लोकमत शुद्ध कसें बनणार? तें काम करण्याचा मार्ग ऋषी–मुनी, साधु–संत दाखवून देत असतात. आपल्या तपश्चर्येनें, आत्मक्लेशानें स्वतःचा व जनतेचा उद्धार करण्याचें व्रत घेतलेले वसिष्ठ, विश्वामित्र व वाल्मिकी यांसारखे ऋषी तें काम करीत असतात. वाल्मिकीनें सीतेचें पावित्र्य पटवून तिला पूज्य बनविली. अखेरीस जगाचा हृदयपालट झाला. म. गांधी आज याच मार्गानें हिंदी जनतेची लोकगंगा पवित्र व शुद्ध बनवून तिला लोकशाहीचें राज्य चालविण्याचें शिक्षण देत आहेत. आपल्या आत्मबलानें व अहिंसेनें सीता-सावित्रीचें तेज हिंदी महिलांत निर्माण करण्याचा प्रयत्न ते करीत आहेत. हिंदु-मुसलमान, स्पृश्यास्पृश्य, ब्राह्मण-ब्राह्मणेतर यांना परस्परांसंबंधीं वाटणारा अविश्वास व द्वेष, संशय व भीति यांचा निरास करण्यासाठीं त्यांना प्रत्येक गांवांत एक एक वाल्मिकी-आश्रम स्थापन झाला तर तो हवा आहे. गांवराज्याचें रामराज्य बनविण्याचें सामर्थ्य अशा पवित्र वाल्मिकी-आश्रमांत असूं शकतें.

## वसिष्ठ-विश्वामित्रांचा अहंकार

वाल्मिकी ऋषींचें आणखी एक मोठेपण आहे तें म्हणजे वसिष्ठाचा व

विश्वामित्राचा अहंकार वाल्मिकीपाशीं नव्हता. पूर्वीं एकेकाळीं विश्वामित्राला क्षत्रियांच्या शस्त्रबलाचा अहंकार झाला होता व तो आपल्या सत्तेच्या बलावर वसिष्ठाच्या धेनूचें हरण करूं लागला होता. तेव्हां वसिष्ठानें त्याचा तो शस्त्रबलाचा अहंकार जिरविला. वसिष्ठाच्या धेनूचें हरण करणाऱ्या विश्वामित्राला पराभूत करणारे हजारों शस्त्रधारी पुढें आले! तेव्हां "धिग्बलं क्षत्रियबलम् । ब्रह्मतेजोबलं बलम्" असे उद्गार विश्वामित्रानें काढले व तो वसिष्ठाचें ब्रह्मतेज आपल्या अंगीं आणण्याच्या मार्गास लागला. आतां विश्वामित्राचा शस्त्रबलाचा अहंकार जिरला होता व तो आत्मबलाचा उपासक बनला होता. पण आतां वसिष्ठाला अहंकार झाला होता. ब्राह्मणजातींत जन्मेल, त्यालाच आत्मबल प्राप्त होईल असा वसिष्ठाला अहंकार होता. विश्वामित्रानें वसिष्ठाचा हा ब्राह्मणजातीच्या श्रेष्ठत्वाचा अहंकार जिरविला. अखेरीस क्षात्रकुलांत जन्मलेल्या विश्वामित्राला ब्रह्मर्षीपद देण्यास वसिष्ठाला मान्यता द्यावी लागली. रामराज्याच्या वेळीं हें वसिष्ठ-विश्वामित्रांचें अहंकारी भांडण मिटलें होतें. रामकालीन वसिष्ठ-विश्वामित्र जातीय अहंकार विसरलेले दिसतात. पण वाल्मिकीचा जन्म वसिष्ठाप्रमाणें ब्राह्मण जातींत किंवा विश्वामित्राप्रमाणें क्षत्रिय जातींत झालेला नव्हता. वाल्मिकीला जातीचा अहंकार मुळींच नव्हता. अस्पृश्य मानिलेल्या जातींनाच हरिजन पदवी देणाऱ्या म. गांधींच्याप्रमाणें वाल्मिकींच्या आश्रमांत उच्चनीच जातिभेद नव्हता. पतितांनाहि पावन करण्याचें सामर्थ्य वाल्मिकीच्या आश्रमांत होतें, म्हणून म. गांधींना वसिष्ठ-आश्रम किंवा विश्वामित्र-आश्रम हे प्रिय नसून वाल्मिकी-आश्रमच आपल्या सत्याग्रही वृत्तीस अनुरूप वाटतात. स्पृश्यास्पृश्य भेदभाव नष्ट करण्याचे आणि हिंदु-मुसलमान धर्मनिष्ठांचा हृदयपालट घडवून आणण्याचे प्रयत्न आत्मबलानें करणारे वाल्मिकी-आश्रम गांवोगांवीं निर्माण झाले, तर गांवराज्याचें रामराज्य बनण्यास वेळ लागेल काय? वाल्मिकीचें अंतःकरण हा करुणेचा आणि प्रेमाचा सागर होता. या सागराला जातीच्या बंधाऱ्याचें बंधन सहन होणें शक्य नव्हतें. जें सामर्थ्य रामचंद्राच्या बाहुबलांत नव्हतें, तें वाल्मिकीच्या तपोबलांत होतें. रामचरित्र वाल्मिकीवांचून इतरहि एकादा कवि कदाचित् लिहूं शकला असता; पण लोकमतानें दोषी ठरविलेली आणि रामचंद्रानें दूर लोटलेली सीता पवित्र व पूज्य आहे अशी जगाची खात्री पटविण्याचें सामर्थ्य

केवळ वाल्मिकीच्या आश्रमांतच होतें! लोकशाही राज्य हें सत्यनिष्ठ व न्यायनिष्ठ राहावयाचें असेल, तर आपलें सत्य व आपला न्याय म्हणजेच आपलें मत सत्तेनें नव्हे, संपत्तीनें नव्हे, शस्त्रानें नव्हे, तर अहिंसेनें, तपश्चर्येनें, सत्यासाठीं भोगाव्या लागणाऱ्या क्लेशानें जनतेस पटवून देणारे सत्याग्रही देशभर पसरले पाहिजेत असा म. गांधींचा आग्रह आहे. म. गांधींना अभिप्रेत असणाऱ्या आत्मबलाचा प्रभाव पाडून समाजाच्या मनाची शुद्धि करण्याचा प्रयत्न बंगालमध्यें स्वतः ते, बिहारमध्यें सरहद्दगांधी खान अब्दुल गफारखान आणि महाराष्ट्रांत साने गुरुजी असे तिघेच आज करीत असल्याचें दिसतें. यांतच रामराज्याचा उगम आहे.

★

# सत्यनिष्ठ बुद्धि

प्रवचन २ रें

प्रत्येक प्राणिमात्राला सुख हवें असतें. कुत्र्या-मांजरांना, गायी-म्हशींना शेळ्या-मेंढ्यांना, किंबहुना, डुकरांनाहि सुख हवें असतें; पण प्रत्येकाची सुखाची कल्पना निरनिराळी असते. कुत्र्या-मांजरांचें, गायी-म्हशींचें, शेळ्या-मेंढ्यांचें व डुकरांचें सुख यांत अंतर आहे. तसेंच या सर्वांचें सुख आणि माणसांचें सुख यांतहि अंतर आहे. कित्येक माणसें एकमेकांवर सारखीं गुरगुरतच असतात. कुत्र्याप्रमाणें गुरगुरण्यांतच त्यांना सुख वाटतें. एक कवि म्हणतो, एका भिक्षुकानें दुसऱ्या भिक्षुकाला पाहिलें, कीं ते एकमेकांवर गुरगुरूं लागतात. इतर कांहीं मांजराप्रमाणें असतात. त्यांना डोळा चुकवून दूध पिण्यांतच सुख वाटतें. मांजरानें कधीं गाय ठेविली आहे काय ? पण तें रोज दूध पितें, असें एक सुभाषित आहे. कांहींना गायी-म्हशीप्रमाणें दुसऱ्यांनीं दावणीला बांधून ठेवून चारा घातला तरीं त्यांत समाधान असतें. बैलाप्रमाणें पोटभर चारा देणाऱ्याच्या शेतांत दिवसभर खपण्यांत त्यांना समाधान वाटतें. कडबा तेवढा आपला, जोंधळा मालकाचा, अशी त्यांची समजूत असते. दिवसभर घाणीला जुंपून पेंड आपणांस चारली म्हणजे त्यांचें समाधान होतें. तेलावर आपला हक्क नाहीं असें त्यांना वाटतें. यांची सुखाची कल्पना गायी-म्हशी, बैलरेडे यांच्या कल्पनेहून भिन्न नसते. इतर कांहीं असे आहेत कीं, त्यांना डुकरांप्रमाणें खातेऱ्यांत लोळण्यांतच आनंद वाटतो. शुद्धीवर असतांना तसें लोळवत नाहीं म्हणून ते दारू पितात किंवा निशा करतात व मग त्यांना खातेऱ्यांत लोळण्याचें सुख चाखतां येतें. पण ही सर्व पशूंचीं सुखें आहेत.

## माणसांचें श्रेष्ठ सुख

माणसांचें सुख या सर्व सुखांहून श्रेष्ठ आहे. त्याला ज्ञान आहे आणि तें ज्ञान प्राप्त करून घेण्याचें बुद्धि हें एक साधन आहे. पण ही बुद्धि सत्याचें ज्ञान करून घेण्यासाठीं जशी वापरतां येते, तशी ती असत्याचें, अन्यायाचें, विषमतेचें समर्थन करण्यासाठींहि वापरतां येते. सत्यनिष्ठ बुद्धि, न्यायनिष्ठ बुद्धि, समत्वयुक्त बुद्धि ही शुद्ध बुद्धि आणि असत्यनिष्ठ, अन्यायी, विषम बुद्धि ही व्यभिचारी बुद्धि. सत्यनिष्ठ आणि समत्वयुक्त बुद्धि हीच आत्मानिष्ठ हीच आत्मनिष्ठ बुद्धि होय. मानवाचा आत्मा म्हणजे सत्याकडे आणि समतेकडे त्याला खेचणारी, ओढून नेणारी शक्ति. ही सत्यनिष्ठेची व समत्वाची प्रेरणा प्रत्येकाच्या अंतःकरणांत असते. ही शुद्ध आत्मप्रेरणा म्हणजेच परमेश्वराचा आवाज, हाच अंतरात्म्याचा आंतरनाद, हाच स्वयंप्रकाश आत्मा, हेंच परब्रह्म. म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात—" सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ॥ " या सत्यनिष्ठ व समत्वयुक्त प्रेरणेनें बुद्धीचें सर्व कार्य करणें हाच मनुष्याचा सर्वश्रेष्ठ धर्म होय. पण मनुष्य या धर्मापासून भ्रष्ट होतो आणि स्वार्थाला, अहंकाराला व ममत्वाला वश होतो. माझा स्वार्थ, माझ्या जातीचा स्वार्थ, माझ्या धर्मबांधवांचा स्वार्थ, माझ्या राष्ट्राचा स्वार्थ मला प्रिय वाटतो आणि त्यासाठीं इतरांचा, इतर जातींचा, इतर धर्मांचा मी द्वेष करूं लागतों. या सर्व प्रकारच्या स्वार्थापासून, ममत्वापासून ज्यांची बुद्धि मुक्त झाली, तेहि अहंकाराला बळी पडतात. कोणाला स्वतःचा, स्वतःच्या बुद्धीचा, स्वतःच्या धनाचा, स्वतःच्या जातीचा, धर्माचा व राष्ट्राचा अहंकार असतो. या अहंकारानेंहि बुद्धि भ्रष्ट होते व त्याचें वर्तन विद्वान् असून मूढासारखें होतें. तो सत्याच्या नांवानें असत्याचा, न्यायाच्या नांवानें अन्यायाचा आणि समतेच्या नांवानें विषमतेचा आग्रह धरूं लागतो. तो स्वार्थहि साधीत नाहीं आणि परमार्थहि साधीत नाहीं. हाच मोह होय. हा मोह ममत्वामुळें उत्पन्न होतो. स्वार्थ, अहंकार व ममत्व यांतून मुक्तता झाल्यावांचून बुद्धीला समत्व प्राप्त होत नाहीं. या समत्वालाच योग म्हणतात. " समत्वं योग उच्यते " असें गीता म्हणते. त्याचप्रमाणें " ममत्वं मोह

उच्यते" असें म्हणतां येईल. बुद्धि सम, शुद्ध व सत्यनिष्ठ बनून मनुष्य व्यवहार करूं लागला म्हणजे त्याला जें सुख, जें समाधान, जी शांति व आनंद प्राप्त होतो, तोच त्याचा आत्मानंद होय. या आनंदाहून श्रेष्ठ असें कोणतेंहि सुख मनुष्याला प्राप्त होऊं शकत नाहीं. हें योगबुद्धीचें सुख शाश्वत, अखंड आणि स्वायत्त आहे.

## योगयुक्त बुद्धीचें उदाहरण

आज आपणांस या योगयुक्त बुद्धीनें व्यवहार करण्याची फार आवश्यकता आहे. परवां पं. जवाहरलाल नेहरू यांनीं आपला स्वतंत्र सार्वभौम लोकराज्याचा ठराव दिल्लींतील घटना-परिषदेपुढें मांडतांना जें भाषण केलें, त्यांत ते म्हणाले, आज आपण एका संधिकालांत एकत्र जमलों आहोंत. एका नव्या राष्ट्राचा जन्म होत आहे. शें-दीडशें वर्षें पारतंत्र्याच्या अंधारांत चांचपडणारें राष्ट्र आतां स्वातंत्र्याच्या प्रकाशांत येऊं लागलें आहे, दिशा फांकल्या आहेत, अंधार नष्ट झाला आहे, तारे मावळूं लागले आहेत. निळया आकाशावर लाल रंग चढूं लागला आहे; पण स्वच्छ व स्पष्ट वाट दिसत नाहीं. आपल्याच सांवल्या राक्षसा-प्रमाणें अक्राळविक्राळ रूप धारण करून आपणांस भेडसावीत आहेत. सावध-पणानें, दृढनिश्चयानें, तत्त्वनिष्ठेनें, निर्भयवृत्तीनें, निर्ममतेनें, जगताचें शाश्वत कल्याण करण्याच्या बुद्धीनें आपल्या राष्ट्राची घटना बनविण्याचा हा काळ आहे. शेंकडों वर्षें परतंत्र असलेले, अज्ञानांत व दारिद्र्यांत घोरत पडलेले, दोन-तीन शतकें जगाच्या मागें राहिलेले लोक आज आपल्या राष्ट्राची घटना बनविण्या-साठीं एकत्र जमले आहेत. सर्व जगाचे डोळे आपणांकडे लागलेले आहेत. इंग्रज मुत्सद्दी म्हणत असतील, या गुलाम व मागासलेल्या राष्ट्राला आम्हीं लोकशाहीचे धडे दिले, ते धडे यानें अद्यापि गिरविले नाहींत. जातिभेद व धर्मभेद हे विसरले नाहींत. स्पृश्यास्पृश्य भेद यांना नडणार आहे. यांना कसली स्वतंत्र सार्वभौम राज्याची घटना बनवितां येणार! यांनीं आपआपसांत भांडून आम्हांला आपल्या घरांत बोलवून नेलें, तसे ते पुन्हां आम्हांला बोलावून नेतील. अमेरिकन मुत्सद्दी म्हणत असतील, हे ब्रिटिशांच्या दास्यांतून सुटले तरी आमच्या सावकारी पाशांत सांपडतील. या सावकारी पाशांनाच ते स्वातंत्र्य म्हणून कवटाळतील. इंग्रजांनीं दीडशें वर्षें त्यांचें धन चोरलें; आतां आपणांस

त्याचा अपहार करतां येईल. यांना आमच्या जॉर्ज वॉशिंग्टनची लोकशाही कशी साधणार व कशी निभणार? स्टॅलिन म्हणत असेल, हें मागासलेलें गुलाम राष्ट्र अखेरीस स्वातंत्र्य म्हणून इंग्रज-अमेरिकन-भांडवलशाहीच्या गुलामगिरीलाच कवटाळील काय? समाजवादी लोकशाही हीच खरी लोकशाही आहे हें यांना समजलें असेल काय? पं. नेहरूंचा व भाई जयप्रकाश यांचा समाजवाद खरा असेल काय? आणि म. गांधी हें काय गूढ आहे? आधुनिक युगांत हा संन्यासी काय करणार? सुवेझपासून सिंगापुरापर्यंत पसरलेलीं छोटीं दुर्बल व परतंत्र राष्ट्रें म्हणत असतील, म. गांधी, पं. नेहरू, भाई जयप्रकाश व नेताजी सुभाषचंद्र यांनीं १९४२ सालीं जो क्रांतिसंग्राम केला, त्याचें आज यांना स्मरण असेल काय? इंग्रजांना आपल्या देशांतून हांकलून देण्याची प्रतिज्ञा हे स्मरत असतील काय? ते आमचें नेतृत्व स्वीकारून आशियांतून सर्व युरोपियनांचीं साम्राज्यें व अमेरिकेची भांडवलशाही नष्ट करण्याच्या कामीं आमचें मार्गदर्शन करतील काय? कां इंग्रज-अमेरिकन-भांडवलदारांशीं भागीदारी करून ते आमचेंच रक्तशोषण करतील? अशा प्रकारें सर्व जगाचे डोळे आज दिल्लीस भरलेल्या घटना-परिषदेकडे लागलेले आहेत. जगांतील सर्व मुत्सद्दी, सर्व व्यवहारपटु, सर्व विचारवंत, सर्व तत्त्वद्रष्टे, आज गांधी–नेहरू–आझाद–सुभाषचंद्र–जयप्रकाश यांचें राष्ट्र काय करणार हें लक्षपूर्वक पाहात आहेत. जगाचा अंतरात्माच जणुं काय आमच्या बुद्धीची, धैर्याची, कृतीची कसोटी पाहात आहे. या आत्म्याशीं योग पावून विचार व आचार करण्याचा अधिकार, ती पात्रता, ती पदवी आम्हांस प्राप्त झाली आहे काय?

## भूतकाल व भविष्यकाल

पण सर्व देशांचें नेतृत्व करणारे आजचे विचारवंतच केवळ आमच्या कृतीकडे पहात आहेत असें नाहीं. आमचा सर्व भूतकाल व मानवजातीचा सर्व भविष्यकाल आमच्या कृतीकडे पाहात आहे. पित्याची प्रतिज्ञा पाळली जावी म्हणून राज्यावर लाथ मारणारे आणि लोकाराधनेसाठीं प्रिय पत्नीचा त्याग करणारे रामचंद्र, कंसाचा, जरासंधाचा व दुर्योधनाचा वध करून धर्मराज्य स्थापून स्वतः त्यापासून अलिप्त राहणारे गोपालकृष्ण, सर्व धर्मांना समान लेखणारे व समत्व बुध्दीनें राज्य करणारे अशोक, अकबर

व शिवाजी, सत्याची व अहिंसेची स्थापना करण्यासाठीं सर्वसंगपरित्याग करणारे गौतम बुध्द व महावीर, कोट्यवधि हिंदी मुसलमानांना खरा धर्म शिकविणारे महंमद पैगंबर, पारशी देशबंधूंना पूज्य असणारे झरतुष्ट्र, हिंदी ख्रिश्चनांना पावन बनविणारे येशू ख्रिस्त आणि शिखांना हिंदु-मुसलमान ऐक्य शिकविणारे गुरु नानक, हे सर्व, आपापले अनुयायी व अभिमानी खऱ्या शुध्द, सम आणि सत्यनिष्ठ बुद्धीनें आपल्या राष्ट्राची घटना बनवीत आहेत काय, हें पाहात आहेत.

## भावी मानव-वंश

भविष्यकाळचे मानवहि जणुं काय आमच्या घटना-परिषदेकडे उत्सुकतेनें जिज्ञासेनें, साशंकतेनें व काळजीनें पाहात आहेत. हे स्वतंत्र सार्वभौम राष्ट्र निर्माण करण्याची प्रतिज्ञा अखेरपर्यंत पाळतील काय? जगांतील साम्राज्य-शाहीचा व भांडवलशाहीचा अंत करून जगाला शांतीचा, सुखाचा व आत्मोन्नतीचा मार्ग हे दाखवितील का? कीं आपला प्रतिज्ञाभंग करून ते आपल्याबरोबर इतरांचाहि घात करून भावी पिढ्यांना दारिद्र्याच्या, दास्याच्या व दैन्याच्या नरकांत लोटतील? अशा प्रकारें या प्राचीन भरतभूमीचे सर्व भूतकालीन थोर पुरुष आणि भविष्यकालीन मानववंश आपणांकडे पाहात आहेत. या नारायणाशीं योग पावून पारतंत्र्याच्या नरकाचा अंत करण्याचें कार्य करण्याइतकी थोर, धीर, प्रखर, तेजस्वी दूरदृष्टि व समत्वयुक्त शुद्ध बुद्धि घटना-परिषदेंत जमलेल्यांनीं धारण करून स्वतंत्र, सार्वभौम भारताचें लोकराज्य म्हणजे त्याची घटना बनवावयाची आहे.

## अखेरचा क्रांति-संग्राम

पूर्ण व शुद्ध समबुद्धीनें बनविलेली ही राज्यघटना सर्व धर्मांचें, सर्व अल्प-संख्याकांचें आणि सर्व राष्ट्रिकांचें स्वातंत्र्यरक्षण करणारी, सर्वांना सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय व समता देणारी, सर्व प्रांतांची व प्रांतविभागांची स्वायत्तता रक्षण करणारी लोकसत्ताक राज्यघटना तयार झाल्यानंतर जर ती ब्रिटिशांनीं मान्य केली नाहीं, तर म. गांधींचा, पं. नेहरूंचा, मौ. आझादांचा, सरदार पटेलांचा आणि भाई जयप्रकाश यांचा हिंदुस्थान मुकाट्यानें स्वस्थ बसेल काय? ज्यांना तसें वाटत असेल, त्यांच्याइतके करंटे

कोणीहि नाहींत. या विभूतींची प्रकृतीच झुंजार आहे. ते लढणार नाहींत असें कोणी म्हटलें, किंबहुना, त्यांनीं स्वतःहि आज तसें म्हटलें, तरी ते अखेरीस लढतील अशीच आमची श्रद्धा आहे. त्यांचा देह उदरभरणासाठीं नाहीं. योगयुक्त बुद्धीनें क्रांतियज्ञांत आहुति देण्यासाठींच ते आपआपला देह पोशीत आहेत. ते या देहाच्या बंधनांतून मुक्त झालेले आहेत. सर्व देशांना व सर्व कालांना व्यापून राहणारा अंतरात्मा, त्याची अंतःप्रेरणा, त्यांना पुढें लोटीत आहे. मरणानें अमर होण्याची कला त्यांना अवगत आहे. त्यांची बुद्धि आत्मनिष्ठ बनलेली आहे. खरा धर्म, मानवाचें खरें सुख आणि जीवनांतील खरा आनंद त्यांनीं चाखलेला आहे. म. गांधी त्यांना या आनंदाची नित्य स्मृति व नित्य प्रेरणा देत आहेत. हजारों वर्षांपूर्वींपासून या लोकांत होऊन गेलेले धर्मपुरुष आज म. गांधींच्या रूपानें या पुण्यभूमींत अवतरले आहेत. सर्व धर्मपुरुषांचा एकच त्रिभुवनतारक दिव्य संदेश आहे, हें जगाला शिकविण्यासाठींच हें प्राचीन भरतखंड आज स्वतंत्र व सार्वभौम लोकराष्ट्र बनत आहे.

★

# खरा प्रभु कोण ?      :  :      प्रवचन ३ रें

कोणत्याहि राज्यांतील राजकीय प्रभुत्व प्रजेकडेच असलें पाहिजे हें तत्त्व खरें पाहिलें असतां फार प्राचीन काळापासून मान्य झालेलें आहे. केवळ लोकमताला मान देण्यासाठीं रामचंद्रानें सीतेचा त्याग केला, यावरूनहि रामराज्याच्या कल्पनेंत राजकीय प्रभुत्व लोकांकडे असावें, प्रजा हीच खरीखुरी प्रभु आहे, असा बोध आपण घेतला पाहिजे. प्राचीन राजनीतिकारांनींहि हाच प्रजेच्या प्रभुत्वाचा सिद्धांत सांगितलेला आहे. प्रजा ही मालक व राजा हा तिचा सेवक किंवा दास आहे असें शुक्रनीति या ग्रंथांत सांगितलें आहे :

स्वभागभृत्या दास्यत्वे प्रजानां च नृपः कृतः
ब्रह्मणा स्वामिरूपस्तु पालनार्थं हि सर्वदा ॥

म्हणजे लोकांच्या संरक्षणासाठीं ब्रह्मानें राजा नांवाचा प्रजेचा ' दास ' निर्माण केला व त्याला त्याचा भाग वेतन म्हणून ठरवून दिलें. यावरून राजाला परमेश्वरानें निर्माण केला असें मानणाऱ्या प्राचीन लोकांना राजा हा प्रजेचा दास आहे व प्रजा त्याचा प्रभु म्हणजे मालक आहे, हा सिद्धान्त मान्य होता असें दिसून येतें. तात्पर्य, राज्याचा प्रभु राजा नसून प्रजा ही प्रभु आहे, हें मत केवळ अर्वाचीन काळांतच उदय पावलेलें नाहीं, तर तें फार जुन्या काळापासून चालत आलेलें आहे.

### पांचामुखीं परमेश्वर

आतां राजा हा परमेश्वरानें निर्माण केला किंवा ब्रह्मानें नियोजित केला

याचा अर्थ काय होतो, तें पाहूं. प्रजेच्या अंतःकरणांत जी न्यायबुध्दि असते तोच परमेश्वर होय. ही न्यायबुद्धि समाजाला सांगत असते, कीं आपण एकमेकांशीं न्यायानें वागावें, दुसऱ्यांना पीडा देऊं नये, दुबळ्यांना साह्यय करावें, दुष्टांचा बंदोबस्त करावा आणि साधूंचें संरक्षण करावें. हें काम करण्यासाठीं गांवपंच नेमले जातात. या पंचांचें सर्वांनीं ऐकावें, त्यांची आज्ञा ही परमेश्वराची आज्ञा मानावी. म्हणून या पंचांच्या मुखानें गांवाची न्यायबुध्दीच बोलत आहे असें लोक म्हणूं लागले. या पंचायतीचें मत हें परमेश्वराचें मत, कारण त्यांना गांवानेंच निवडलें आहे व गांवाचें रक्षण करणें हेंच त्यांचें काम अशी प्राचीन समजूत होती. 'पांचामुखीं परमेश्वर' या म्हणीचा खरा अर्थ हा आहे. गांवच्या सर्व लोकांनीं निवडलेल्या पंचांनाच हें वर्णन लागू पडतें हें उघड आहे. हिंदुस्थानांतील लोकशाही गांवपंचायतीच्या रूपानें जिवंत होती. या म्हणीच्या रूपानेंहि पंच—लोकनियुक्त प्रतिनिधी—हेच परमेश्वर, हाच अर्थ आपणांस कळतो. पण कालांतरानें जे पंच लोकनियुक्त होते ते वतनदार झाले आणि प्रजा आपलें प्रभुत्व विसरली. गांवांतील वतनदार पाटील, कुलकर्णी, देशपांडे, देशमुख हे प्रभु बनले. प्रजेच्या अंतःकरणांतील प्रभूला ते विसरले आणि प्रजाहि आपण प्रभु आहों, हें विसरली. ती वतनदार, सरदार, जहागिरदार व राजे यांना प्रभु समजूं लागली. अशा प्रकारें प्रजेच्या अज्ञानामुळें राजे प्रभु बनले. आज प्रजेच्या अंतःकरणांतील प्रभु जागा झाला आहे व म्हणून पुनः लोकराज्य, गांवराज्य, समाजसत्ता या कल्पना, हे विचार, हें ध्येय पुढें येत आहे. आपला प्रभु गांवचा वतनदार नव्हे, राजा नव्हे, बादशहा नव्हे, तर आपला अंतरात्मा हाच आपला प्रभु; प्रजेचा अंतरात्मा हाच राज्याचा खरा प्रभु याची जाणीव म. गांधी, पं. नेहरू, राष्ट्रसभा हे करून देत आहेत. हिंदुस्थानचें खरें सार्वभौमत्व या प्रजेच्या अंतरात्म्याकडे आहे. प्रजेचा सुप्त अंतरात्मा जागृत करणें हें प्रजेच्या नेत्यांचें कार्य आहे. पण प्रजेचे नेते हे तोंडपुजे असतां कामा नयेत.

## सॉक्रेटिसाचें बलिदान

राजे सार्वभौम बनले, राज्याचे ते प्रभु बनले म्हणजे त्यांचे स्तुतिपाठक निर्माण होतात. तसेंच प्रजा प्रभु बनली म्हणजे प्रजेचेहि स्तुतिपाठक किंवा

तोंडपुजे निर्माण होतात. राजानें बैलाला घोडा म्हटलें तर "होय सरकार, हा घोडा आहे" असें म्हणणारे तोंडपुजे संस्थानिकांपाशीं असतात. तसेंच लोकांच्या हातीं सत्ता आली म्हणजे बहुमताची स्तुति करणारे तोंडपुजे निघतात. हे लोकसत्तेचे मित्र नसून वैरीच समजले पाहिजेत. लोकसत्ता म्हणजे लोक सांगतील तेंच सत्य असें ओरडत सुटावें असा न्याय नव्हे. सत्ता बहुमताच्या हातीं असावी, कायदे बहुमतानें व्हावेत, बहुमतानें केलेल्या कायद्यांप्रमाणें कारभार व्हावा, एवढाच याचा अर्थ आहे. पण बहुमतानें जो निर्णय ठरविला तोच सत्य आहे, असें म्हणण्याची सक्ती माझ्यावर कोणीहि करूं शकत नाहीं असें सॉक्रेटीस म्हणत असे. अडीच हजार वर्षांपूर्वी ग्रीस देशांतील अथेन्स शहरांत हा थोर पुरुष होऊन गेला. अथेन्समध्यें लोकसत्ता होती. पण तेथील लोकांना न्याय, अन्याय, धर्म, अधर्म, सत्य, असत्य हें ओळखतां येईनासें झालें होतें.

अथीनियन लोक सत्ताधाऱ्यांचे, संपत्ती-मानाचे आणि रूढीचे दास झाले होते. सॉक्रेटिसाला दिसून आलें कीं, सत्ता व संपत्ति यांच्या मागें लागलेले हे लोक सत्यापासून दूर जात आहेत. त्यांना सत्याचें, न्यायाचें व नीतीचें ज्ञान आपण करून दिलें पाहिजे. म्हणून त्यानें सत्यप्रचाराचें व्रत घेतलें. लोकांचें, सत्ताधाऱ्यांचें, रूढीचें भय सोडून सत्याचा प्रचार करण्याचा मार्ग त्यानें स्वीकारला. अथेन्समधील धनिकांना, सत्ताधाऱ्यांना व परंपराभक्तांना त्याची भीति वाटूं लागली. तो तरुणांना अधार्मिक व अनीतिमान बनवितो असा आरोप ठेवून अथेन्समधील लोकसभेपुढें त्याला त्यांनीं उभें केलें. "तुझा हा सत्याचा प्रचार थांबविशील तर तुला क्षमा करण्यांत येईल, नाहींतर तूं या राज्याच्या बाहेर निघून जा. यांपैकीं कोणतेंहि करण्याचें नाकारशील तर तूं समाजाचा, धर्माचा, कायद्याचा व राज्याचा द्रोही आहेस, असें ठरवून तुला विष देऊन ठार करण्यांत येईल" असें लोकसभेनें त्यास फर्माविलें.

## "मला मृत्यूचें भय नाहीं!"

सॉक्रेटीस जितका लोकसत्तेचा भक्त होता, तितकाच तो सत्याचाहि भक्त होता. सत्याचें ज्ञान अंतरात्म्याच्या प्रकाशानेंच होऊं शकतें, म्हणून हा "अंतरींचा ज्ञानदिवा" मालविण्यास तो तयार नव्हता. हा ज्ञानदिवा मालविला गेला तर लोकसत्ता भ्रष्ट होते, हें त्याला माहीत होतें. म्हणून

त्यानें ज्ञानदिवा मालविणार नाहीं व माझा ज्ञानदिवा घेऊन मी देशत्याग करणार नाहीं असें उत्तर दिलें. " ज्या समाजांत मी जन्मास आलों व वाढलों त्याला शहाणें करणें हें कर्तव्य मीं स्वीकारलें आहे. हें कर्तव्य करीत असतां सत्ताभय, लोकभय व परंपराभय मी धरणार नाहीं. तुम्हीं दिलेली विषप्राशनाची शिक्षा मी आनंदानें भोगण्यास तयार आहे. लोकसत्तेचा व समाजाचा मी सेवक आहें. पण म्हणूनच मी माझ्या अंतरात्म्याच्या प्रकाशांत मला जें सत्य दिसेल तेंच तुम्हांस सांगेन. मला देहाच्या मृत्यूचें भय वाटत नाहीं; पण माझ्या अंतःकरणांतील ज्ञानदिवा मालविण्याचें भय मला वाटतें. म्हणून लोसत्तेच्या भक्तीसाठीं लोकांनीं दिलेली विषप्राशनाची शिक्षा भोगण्यास मी तयार होतों; आणि लोकसत्ता शुद्ध रहावी म्हणून देहाचा बळी देऊन सत्याशीं एकनिष्ठ राहण्याचा धडा तुम्हांस देतों." हा सॉक्रेटीस लोकसत्तेचा खरा भक्त होता. कारण तो आत्मसत्तेची, सत्यनिष्ठेची, सत्यासाठीं लोकभय, राजभय व धर्मभय सोडून आपलें बलिदान करण्याची महती ओळखीत होता असें सर्व जगानें आज मान्य केलें आहे. लोकसत्तेच्या युगांत असे सत्याग्रही लोकनायक लागतात. कारण राजकीय दृष्टीनें खरा प्रभु प्रजा हाच असला, तरी आध्यात्मिक व नैतिक दृष्टीनें अंतिम प्रभुत्व आपल्या अंतरात्म्याकडेच आहे. हा अंतरात्मा जागृत करणारे सत्याग्रही जितके होतील, तितकें लोकराज्य हें आत्मराज्य अथवा रामराज्य बनेल. आत्मारामाचें प्रभुत्व शुद्ध अहिंसात्मक सत्याग्रहानेंच निर्माण होईल, हा सॉक्रेटिसाचाच संदेश आज म. गांधी मानवाला देत आहेत. बुद्ध, सॉक्रेटीस व ख्रिस्त या क्रांतिकारकांनीं लोकसत्तेचा जो आध्यात्मिक पाया घातला तोच पाया आधुनिक लोकशाहीला घाला, असा दिव्य संदेश भरतखंड म. गांधींच्या मुखानें जगाला देत आहे.

★

# चोरी आणि काम : : प्रवचन ४ थें

समाजाला जगण्यासाठीं संपत्ति लागते, आणि ही संपत्ति काम केल्या-वांचून निर्माण होत नाहीं. संपत्ति म्हणजे केवळ चलनी नाणें किंवा पैसा नव्हे. त्या पैशानें आपण ज्या उपभोगाच्या वस्तू विकत घेतों तीच खरी संपत्ति होय. उदाहरणार्थ, धान्य, कापड, घरें, जनावरें, इत्यादि सर्व उपभोगाच्या वस्तू हीच समाजाची संपत्ति होय. या उपभोगाच्या वस्तू निर्माण करण्यासाठीं जीं साधनें लागतात तीहि संपत्तीच होय. उदा० शेतीला लागणारे नांगर, खतें, जमीन हीं सर्व साधनें संपत्तीच होय. कारण या वस्तू जरी प्रत्यक्ष उपभोगाच्या नसल्या तरी त्या साधनांच्या योगानें आपणांस धान्यादि उपभोगाचे पदार्थ-निर्माण करितां येतात म्हणून त्यांना समाजाची साधनसंपत्ति असें म्हणतां येईल. मोठमोठे कारखाने व खाणी ही अशींच संपत्ति उत्पादन करण्याचीं साधनें होत. अन्नधान्य, कपडा, राहण्याचें घर, घरांतील नित्योपयोगी वस्तू ही आपली उपभोग्य संपत्ति, आणि शेतजमिनी, नांगर-खतें, खाणी, कारखाने इत्यादि पदार्थ ही समाजाची उत्पादन-संपत्ति किंवा साधन-संपत्ति होय. या दोनहि प्रकारच्या संपत्तींत एकसारखी भर घालावी लागते. उपभोगानें संपत्ति संपते तशीच ती उपभोग न घेतां केवळ सांठवून ठेवल्यानेंहि नाश पावत असते. म्हणून समाजाच्या संपत्तींत एकसारखी भर पडत राहावी लागते आणि ही भर समाजांतील लोकांनीं काम केल्यावांचून पडत नाहीं. समाजाची श्रमशक्ति हीच सर्व संपत्तीचें आदिकारण आहे असें म्हटलें तरी चूक होणार नाहीं. समाजाच्या जीवनाला हें

धनोत्पादनाचें कार्य एकसारखें चालू राहाणें अत्यंत आवश्यक आहे. यासाठीं समाजांतील प्रत्येक प्रौढ आणि सुदृढ व्यक्तीनें उत्पादनाच्या कामांत कांहीं-तरी भाग घेतला पाहिजे. संपत्तीचा उपभोग घेतल्यावांचून कोणताहि मनुष्य जगूंहि शकत नाहीं. अर्थात् प्रत्येक मनुष्य समाजांत उत्पन्न होणाऱ्या संप-त्तीचा उपभोग घेतच असतो. म्हणजेच तो एकप्रकारें समाजाच्या संपत्तीचा विनाश करीत असतो. अर्थात् आपण जितकी संपात्ति उपभोगून नष्ट केली तितकी तिच्यांत भर घालण्याची जबाबदारी नैतिक दृष्टीनें त्याच्यावर पडली पाहिजे. दुसऱ्यानें श्रम करावेत आणि त्यांच्या श्रमांतून निर्माण झालेली संपात्ति आपणांस उपभोगतां यावी ही वृत्ति म्हणजेच चोरांची वृत्ति होय. स्वतः श्रम न करितां संपत्तीचा उपभोग घेण्याचा हक्क केवळ लहान मुलें, म्हातारीं मनुष्यें आणि रोगी, अंध, पंगू एवढ्यांनाच असला पाहिजे. जो धडधाकट आहे आणि ज्याला काम करणें शक्य आहे अशा मनुष्यानें केवळ आपल्या आईबापांनीं, वाडवडिलांनीं किंवा पूर्वजांनीं संपत्ति मिळवून ठेवली म्हणून काम न करितां समाजाच्या संपत्तीचा उपभोग घेणें ही नैतिक दृष्ट्या चोरीच समजली पाहिजे.

## कायदेशीर आणि बेकायदेशीर चोरी

नैतिक दृष्टीनें ज्या व्यवहारांत अशा प्रकारची चोरी आहे त्यांपैकीं अनेक व्यवहार आजच्या कायद्यानें चोरी या सदरांत पडूं शकत नाहींत. उदा० कोणत्याहि वस्तूचा बाजारभाव कायद्यानें नियंत्रित केला म्हणजे त्यापेक्षां अधिक भावानें ती वस्तु विकणें हा कायदेशीर गुन्हा होतो. अशा व्यवहारांनाच आज आपण काळाबाजार असें म्हणतों. ही एक प्रकारची चोरीच आहे; परंतु ज्यावेळीं सरकार असे भावनियंत्रणाचे कायदे करीत नाहीं, त्यावेळीं आपला माल कोणी कोणत्याहि भावानें विकला तरी त्याला कायदेशीर दृष्टीनें कोणी गुन्हेगार समजत नाहीं व हे सर्व व्यवहार 'काळा बाजार' या नांवास पात्र नसतात. व्यवहारांत तो पांढरा बाजारच ठरत असतो. परंतु एवढ्यानें वाटेल त्यानें वाटेल तितकी किंमत घेणें हें न्यायाचें ठरूं शकत नाहीं. आणि जे आर्थिक व्यवहार न्यायाचे नव्हेत ते कायदे-शीर असले, तरी नैतिक दृष्टीनें ती चोरीच समजली पाहिजे. समाजांतील आर्थिक व्यवहारांत जेव्हां जेव्हां अन्यायाची वाढ होऊं लागते आणि सामाजिक श्रम-

शक्तींतून निर्माण होणारी संपत्ति श्रम न करणाऱ्या वर्गाकडे अधिकाधिक जाऊं लागते, तेव्हां तेव्हां समाजांतील कायदेशीर चोरीचें प्रमाण वाढलें आहे असेंच म्हणावें लागतें. समाजांत ज्या मानानें आर्थिक व्यवहारांची अधिकाधिक गुंतागुंत होऊं लागते आणि व्यापारी, सावकारी, जमीनदारी व कारखानदारी यांची वाढ होऊं लागते, त्या मानानें कायदेशीर चोरीचें प्रमाणहि वाढत जातें. ज्यांच्या श्रमामुळें संपत्तीची उत्पत्ति होते त्यांना तिचा संग्रह मुळींच करितां येत नाहीं; आणि ज्यांच्यापाशीं संग्रह वाढत जातो त्यांना त्यांच्या वाढीसाठीं कोणत्याहि प्रकारचे श्रम करावे लागत नाहींत. श्रम आणि संग्रह यांचें प्रमाण व्यस्त बनलेलें असतें. धनिकांना श्रम करावे लागत नाहींत आणि श्रमिकांना धन मिळत नाहीं, या सर्व गोष्टी कायदेशीर व्यवहारानें होत असतात. अशा परिस्थितींत कायदा हा सावांचें रक्षण करीत नसून चोरांचें रक्षण करीत असतो असें म्हणावें लागतें. हे कायदे मोडण्याकडे लोकांची प्रवृत्ति होते. पण केवळ एकेकट्या व्यक्तीनें आपापल्या स्वार्थासाठीं समाजांतील कायदे मोडूं लागल्यानें समाजांत सुव्यवस्था नांदूं शकणार नाहीं. अशा वेळीं ही कायदेशीर चोरी नष्ट करावयाची, तर संपत्तीच्या मिळकतीसंबंधीं आणि संग्रहासंबंधीं ज्या पद्धती रूढ झालेल्या असतील, त्या सर्व आमूलाग्र बदलून नव्या पध्दतीवर समाजाची आर्थिक घटना करावी लागते. जुन्या पध्दतीमुळें ज्या धनिक वर्गाचा फायदा होत असतो, त्या वर्गाचा, समाजाची आर्थिक घटना बदलण्यास विरोध होतो आणि जुनी पध्दत चालू राहिल्यामुळें ज्या श्रमिक वर्गाचें नुकसान किंवा अनहित होत असतें, त्या वर्गाला क्रांतीची आवश्यकता पटूं लागते. अशा वेळीं धनिक वर्ग आणि श्रमिक वर्ग ह्यांच्यामध्यें एक प्रकारचा वर्गकलह किंवा वर्गयुध्द निर्माण होतें. आज सर्व जगांत एका बाजूला भांडवलदार-जमीनदार, सावकार आणि कारखानदार आणि दुसऱ्या बाजूस कामकरी–शेतकरी यांच्यामध्यें वर्गयुध्द सुरू झालेलें आहे. हें वर्गयुध्द कोणी कांहीं तत्त्वज्ञान शिकविल्यामुळें निर्माण झालेलें नसून भांडवलशाही आर्थिक व्यवहारांमुळें जें कायदेशीर चोरीचें प्रमाण वाढलेलें आहे, त्यामुळेंच हें वर्गयुध्द प्रत्येक देशांत पेटत आहे.

### कौरव–पांडवांचा लढा

हें वर्गयुध्द म्हणजे दोन भिन्न राष्ट्रांतील किंवा दोन भिन्न धर्मांतील

अथवा दोन भिन्न जातींतील लढा नव्हे; तर एकाच राष्ट्रांत, एकाच धर्मांत किंवा एकाच जातींत नांदणाऱ्या दोन वर्गांतील लढा आहे, ह्याचा स्पष्ट बोध आपण करून घेतला पाहिजे.

आम्हांला हिंदूंविरुद्ध मुसलमान, ब्राह्मण विरुध्द मराठा, स्पृश्य विरुद्ध अस्पृश्य हे लढे समजूं शकतात. परंतु जमीनदार विरुद्ध शेतकरी, कारखानदार विरुद्ध कामकरी आणि सावकार विरुद्ध त्यांचीं कुळें यांच्यामधील लढा अद्यापि बरोबर समजत नाहीं. जातिनिष्ठा आणि धर्मनिष्ठा आमच्या अंगांत मुरलेली आहे. परंतु ज्यांचे आर्थिक हितसंबंध एक आहेत, ते कोणत्याहि जातीचे किंवा धर्माचे अथवा वंशाचे असले, तरी ते सर्व एकाच वर्गांत पडतात आणि त्यांचे आर्थिक व्यवहार एकाच प्रकारचे न्यायाचे किंवा अन्यायाचे होत असतात याची जाणीव आम्हांला अद्यापि स्पष्ट होत नाहीं. पण या वर्गयुद्धांत श्रमिक वर्गाचा विजय व्हावा असें ज्यांना वाटतें, त्यांनीं ही जाणीव आतां बुद्धिपुरस्सर निर्माण केली पाहिजे. ज्याप्रमाणें अर्जुनाला आपल्या कुलांत जन्मलेल्या कौरवांशीं धर्मयुद्ध करण्यांत पाप आहे असा मोह झाला होता, तसाच मोह आपल्या राष्ट्रांतील सामान्य जनतेला होऊन आपल्याच धर्मांतील व आपल्याच जातींतील धनिक वर्गाविरुद्ध आर्थिक लढा करण्यांत पाप आहे असें तिला वाटत असतें. एकाच धर्मांतील दोन व्यक्ती जर दोन वर्गांत पडत असतील, म्हणजे जर एक सावकार असेल व दुसरा त्याचें कूळ असेल, तर त्या दोन व्यक्ती केवळ एकाच धर्माच्या असल्यामुळें त्यांचे हितसंबंध एक होऊं शकत नाहींत. आपल्या धर्माचा व जातीचा चोर आपणांस लुबाडूं शकतो किंवा प्रसंगीं आपला प्राणहि घेऊं शकतो, त्याचप्रमाणें आपल्या जातीचा व धर्माचा सावकारहि आपली आर्थिक पिळवणूक करूं शकतो. ह्या व्यवहारांत तो जात, गोत, धर्म, किंबहुना, राष्ट्र यांचीहि जाणीव ठेवीत नाहीं. म्हणून ज्यांचे ज्यांचे आर्थिक हितसंबंध एक आहेत व म्हणून जे एकाच वर्गांत पडतात, त्या सर्वांची जात व धर्म विसरून आपण एकजूट केली पाहिजे. हा धडा श्रम करणाऱ्या शेतकरी व कामकरी वर्गाला दिल्यावांचून आपलें ह्यापुढील राजकारण योग्य प्रकारें चालणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या समाजाची सर्वच व्यवस्था गोंधळ माजून मोडून पडेल. आजचे भांडवलदार हे कौरव आहेत आणि कामगार हेच पांडव आहेत.

पहिल्यानें दुसऱ्याची सत्ता आणि संपत्ति लुबाडून घेतली आहे आणि ती कायदेशीर मार्गांनीं घेतली आहे. आपल्या सर्व व्यवहारांस ते कायद्याचा व धर्माचा आधार देत आहेत, पण त्यांच्या बाजूस न्याय व नीति नाहीं. ज्या कायद्याच्या व धर्माच्या मागें न्यायाचा व नीतीचा पाठिंबा नाहीं, तो कायदा व धर्म समाजाची धारणाच करूं शकत नाहीं. अशा कायद्यानें व धर्मानें समाजाचें हित होणार नाहीं. किंबहुना, अशा कायद्याला व धर्माला खरा कायदा व खरा धर्म असेंहि म्हणतां येणार नाहीं. न्यायाच्या संस्थापने-साठीं त्यांच्याविरुद्ध क्रांति करणें हाच खरा धर्म होऊं शकतो.

## नवा क्रांतिधर्म

धर्म, रूढी आणि कायदे यांचीं बंधनें समाजाच्या धारणेसाठीं असतात आणि हीं बंधनें समाजाच्या व्यवहारांत जसे जसे फरक पडतील, तशीं तशीं बदलून घ्यावीं लागतात. समाजाच्या जीविताला आवश्यक असे आर्थिक व्यवहार योग्य प्रकारें चालावेत म्हणून मालमत्तेसंबंधींचा कायदा केलेला असतो. या कायद्यानें प्रत्येकाचे मालकी हक्क ठरवून दिलेले असतात आणि ते हक्क इतरांनीं लुबाडून घेऊं नयेत अशी तरतूद केलेली असते. ह्या सर्वांचा हेतु समाजांतील संपत्तीची उत्पत्ति अधिक व्हावी, जे श्रम करतील त्यांनाच तिचा उपभोग घेतां यावा, जे अधिक श्रम करतील त्यांना अधिक संपत्ति मिळावी, श्रम करणाऱ्या व्यक्तींच्या सर्व शक्तींचा योग्य विकास व्हावा आणि अति उपभोगानें किंवा कोणतेंहि काम न करण्यानें त्या शक्तींचा ऱ्हास किंवा विनाश होऊं नये, हा असला पाहिजे. अशा हेतूनें केलेल्या मालमत्तेच्या व मालकीहक्काच्या कायद्यांमुळें उत्पादनाचें कार्य वाढत जातें. नवे नवे शोध लागतात. थोड्या श्रमांत अधिक उत्पादन करतां येतें आणि जगाच्या एका टोकाचा माल दुसऱ्या टोकाकडे नेऊन विकतां येतो. हजारों लोकांचें धन एकत्र करून कोट्यवधि व अब्जावधि रुपयांचें भांडवल उभारतां येतें. शेंकडों लोकांच्या श्रमानें निर्माण होणारा माल दोन-चार मजूर लावून निर्माण करतां येतो आणि हजारों लोकांच्या श्रमांतून उत्पन्न होणाऱ्या संपत्तीचा थोडा थोडा अंश जमवून कोणतेंहि श्रम न करितां नवकोट नारायण बनतां येतें. अशा वेळीं पूर्वींचा मालकीहक्काचा व मालमत्तेचा कायदा बदलून घेऊन नवा कायदा

केला नाहीं, तर समाजांत गोंधळ माजल्याशिवाय राहात नाहीं. ह्यासाठींच समाजाच्या मालकीखालीं सर्व जमिनी व कारखाने आणावेत, असें म्हणणारा समाजवाद आज पुढें आलेला आहे. भौतिक विद्येचे आणि यंत्रकलेचे नवे शोध झालेले आहेत, त्यांचा उपयोग करून समाजाचीं भौतिक संपत्ति वाढवावी; पण त्याचबरोबर समाजांतील शेतकरी-कामकरी ह्या वर्गाच्या हातीं सर्व सत्ता व संपत्ति जावी असें ह्याचें ह्मणणें आहे. आजपर्यंत हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, बुध्द इत्यादि अनेक धर्मांनीं ज्या ज्या समाजपध्दती निर्माण केल्या, त्या सर्व समाजपध्दतीखालीं शेतकरी–कामकरी वर्ग हा संपत्ति, सत्ता व संस्कृति यांच्यापासून बहुशः दुरावलेला असाच वर्ग होता. त्या काळांत कदाचित् संपत्ति-उत्पादनाचीं साधनें आजच्याइतकीं वाढलीं नसल्यानें तसें करणें अपरिहार्य असेल, पण आज तसें करण्याला तेंहि कारण उरलेलें नाहीं. सर्वांच्या म्हणजे कष्टजीवी जनतेच्या सुखाची, स्वातंत्र्याची आणि संस्कृतीची इयत्ता वाढवण्याची शक्यता आजच्या भौतिक संशोधनामुळें निर्माण झालेली आहे. कष्टजीवी जनतेच्या सुखाच्या, स्वातंत्र्याच्या आणि संस्कृतीच्या आड आज जर कांहीं येत असेल, तर धनिकवर्गाचे मालकीहक्क हेच होत.

## श्रम, अस्तेय आणि असंग्रह

भांडवलशाही व्यवहारामुळें आजच्या समाजांत वर्गयुद्ध माजलें आहे. हें वर्गयुद्ध समाजवादी माजवीत नाहींत. तर हें वर्गयुद्ध माजणार नाहीं अशा तऱ्हेची नवी समाजरचना घडवून आणण्यासाठीं त्यांना प्रयत्न करावयाचे आहेत. हे प्रयत्न करण्यासाठीं त्यांना शेतकरी-कामकरी वर्गाला संघटित केलें पाहिजे, आणि तें करीत असतां जाती व धर्म ह्यांचे भेद विसरून वर्गभावना जागृत केली पाहिजे. ज्या धनिक वर्गाच्या मालकीहक्कांना ह्या समाजवादामुळें धोका येणार आहे, त्यांना सामान्य जनतेंत फैलावणारी ही वर्गभावना भयंकर व भीषण वाटत आहे आणि ह्मणून त्या जनतेला जातिनिष्ठेंत व धर्मनिष्ठेंत कुचमून ठेवण्यास जमातवादी राजकारणें व राजकीय पक्ष ते लोक निर्माण करीत आहेत. कष्टजीवी जनतेचे खरे हितशत्रू हे जमातवादी पुढारी आहेत. या जमातवादी राजकारणापासून जनतेचें हित होणार नसून केवळ धनिक वर्गाचें हित कांहीं काळ होणार आहे. पण तेंहि हित फार काळ टिकणारें

नाहीं. समाजधारणेला आज अत्यंत आवश्यक असणारी समाजवादी रचना अडवून धरण्यांत धनिक वर्गाला अखेरीस यश येणार नाहीं. ही आवश्यक क्रांति अनत्याचारानें व अहिंसेनें व्हावी असा महात्मा गांधींचा आग्रह आहे व राष्ट्रसभेलाहि तेंच इष्ट आहे. पण जनतेला अवश्य असणारी ही क्रांति राष्ट्र-सभेनें राजदंड हातीं घेतल्यानंतर केवळ हितोपदेशानें घडून येईल अशी अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं. राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळांनीं आपल्या राजदंडाचा उपयोग धनिक वर्गाचे मालकीहक्क कमी कमी करण्याकडे आणि शेतकरी-कामकऱ्यांचें राज्य स्थापन करण्याकडे झपाट्यानें केला पाहिजे. ते तसें करतील तर त्यांना आपल्या राजदंडाचा क्रांतिधर्मास उपयोग करून दिल्याचें श्रेय लाभेल आणि हिंदुस्थानांतलि समाजवादी क्रांति अनत्याचारी मार्गानें घडूं शकेल. समाजवाद हाच आजचा युगधर्म आहे, आणि त्याच्या संस्थापनेनेंच सत्य, अहिंसा इत्यादि महात्मा गांधी उपदेशीत असलेलीं धर्माचीं सनातन तत्त्वें समाजघटनेंत अधिकांत अधिक प्रमाणांत प्रकट होऊं शकतील. श्रम, अस्तेय आणि असंग्रह या तीन तत्त्वांवर समाजाची उभारणी करण्यापूर्वी धनिकांचें स्तेय किंवा चोरी थांबविली पाहिजे, आणि त्यांचा संग्रह नष्ट केला पाहिजे. धनिक वर्ग श्रमिकांच्या धनाची जी कायदेशीर चोरी करतो, त्याला पिळणूक असें नांव मार्क्सनें दिलें. या चोरीचा शास्त्रीय शोध त्यानें लाविला म्हणून तो या नव्या युगधर्माचा द्रष्टा समजला जातो. हा नवा युगधर्म जी क्रांति करूं पहात आहे त्याचें खरें ध्येय श्रम, अस्तेय व असंग्रह या तत्त्वांची स्थापना करावी हेंच आहे असेंहि ह्मणतां येईल. आजच्या परिस्थितींत हीं सनातन तत्त्वें समाजांत प्रस्थापित करण्याचा समाजवाद हाच मार्ग आहे, म्हणून त्याला युगधर्म असें म्हणतां येतें.

★

# वर्गयुद्ध हेंच धर्मयुद्ध : : प्रवचन ५ वें

मागील प्रवचनांत मीं सांगितलें कीं, प्रत्येक देशांत आज धनिक विरुद्ध श्रमिक, भांडवलदार विरुद्ध कामगार किंवा जमीनदार-कारखानदार विरुद्ध शेतकरी-कामकरी असा लढा चालू आहे. हा लढा म्हणजेच कौरव-पांडवांचा लढा होय. देव-दानवांचा म्हणा, सुरासुरांचा म्हणा किंवा कौरव-पांडवांचा म्हणा; हे लढे अन्याय विरुद्ध न्याय, स्तेय विरुद्ध अस्तेय, हिंसा विरुद्ध अहिंसा म्हणजेच असत्य विरुद्ध सत्य असे होत. आजच्या समाजांत धनिक जो धनसंग्रह करतात, तो स्तेयाचा व हिंसेचा द्योतक असतो. म्हणूनच ज्यांना अस्तेय व अहिंसा यांचा आधार समाजरचनेला द्यावा असें वाटतें, ते हें स्तेय व हा संग्रह नष्ट करण्याचा प्रयत्न आज करीत आहेत. ज्यांच्या हातीं राजसत्ता आहे त्यांनीं भांडवलदारी संग्रह कायदेशीर मार्गानेंच नष्ट केला पाहिजे असें ते म्हणतात. यासाठींच शेतकरी-कामकरी वर्गाच्या हातीं राजसत्ता गेली पाहिजे असें कॉंग्रेस म्हणते. गांधीवादी व समाजवादी या दोघांनींहि आज शेतकरी-कामकरी राज्याचें ध्येय मान्य केलें आहे. हें शेतकरी-कामकरी राज्य स्थापन होईल, तेव्हांच समाजघटनेंत शिरून बसलेली चोरी आणि हिंसा नष्ट होईल व म्हणूनच हा शेतकरी-कामकरी-राज्याच्या स्थापनेचा लढा हा अस्तेयाच्या व अहिंसेच्या स्थापनेचा लढा बनलेला आहे. यालाच धर्मयुध्द हें नांव शोभूं शकतें; पण भांडवलदारांना व जमीनदारांना हें धर्मयुध्द जनतेनें लढावें, असें वाटत नाहीं. हें खरें धर्मयुध्द लढण्याचें जर जनतेला एकदां

पटलें, तर तें अनत्याचारानेंहि जनतेला विजय मिळवून देऊं शकेल, याची जाणीव जमीनदार-कारखानदारांना आहे. म्हणून जनतेला या खऱ्या धर्म-युध्दापासून पराङ्मुख करण्यासाठीं वरिष्ठ वर्ग खोटें धर्मयुध्द या देशांत पेटवूं पहात आहे.

## खरें व खोटें धर्मयुद्ध

मी काय म्हणतों, त्याचा अधिक उलगडा व्हावयाचा, तर आपल्या देशांत हिंदु, मुसलमान व शीख या तीन धर्मांत जो लढा सुरू आहे, व कदाचित् जो अधिकच पेटत जाण्याची भीति आज वाटत आहे त्याचा थोडा शांत चित्तानें विचार केला पाहिजे. हा लढा पंजाबांत फार तीव्र व उग्र स्वरूप धारण करूं लागला आहे. शीख म्हणतात पंजाब प्रांत हा शिखांचा आहे, हिंदू म्हणतात हा हिंदूंचा असून शिख हे हिंदूच आहेत, आणि मुसलमान म्हणतात कीं हा प्रांत मुसलमानांचा आहे; कारण त्या प्रांतांत मुसलमान ५१-५२ टक्के आहेत. यामुळें या पंजाब प्रांतांत आज एक 'धर्मयुध्द' पेटत आहे व त्यालाच खरें धर्मयुध्द समजून त्या त्या धर्माची जनता—शेतकरी जनता—आपापल्या धर्माच्या पुढाऱ्यांमागून आंधळेपणानें जात आहे. पण या शेतकरी जनतेला आज खऱ्या धर्मयुध्दाची, म्हणजेच वर्गयुध्दाची जाणीव नाहीं. पंजाब हा हिंदूंचा, मुसलमानांचा किंवा शिखांचा आहे हा प्रश्न महत्त्वाचा नसून तो शेतकऱ्यांचा आहे कीं जमीनदारांचा आहे, हाच एक प्रश्न जनतेच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. म्हणून या प्रांतांत आज जो लढा चालू आहे, तें खोटें धर्मयुध्द असून शेतकरी विरुध्द जमीनदार हेंच खरें धर्मयुध्द आहे, याची जाणीव तेथील जनतेला आपण करून दिली पाहिजे. हें जर आपल्या ध्यानांत आलें, तर समाजवाद हाच आजचा युगधर्म आहे असें मी कां ह्मणतों, त्याची आपणांस स्पष्ट कल्पना येऊं शकेल.

## आजचा युगधर्म

'समाजवाद हा आजचा युगधर्म आहे' या म्हणण्याचा अर्थ आपण बरो-बर समजून घेतला पाहिजे. ज्या कामकरी-शेतकरी वर्गाला आजपर्यंतच्या निरनिराळ्या धर्मांनीं शूद्र, अतिशूद्र अशीं नांवें देऊन सत्तेपासून संपत्तीपासून आणि संस्कृतीपासून दूर ठेवलें त्या शेतकरी-कामकरी वर्गाच्या हातीं सत्ता,

संपत्ति व संस्कृति देणें हें आजचें मानव-समाजाचें कर्तव्य आहे. हिंदुस्थान हिंदूंचा आहे कीं मुसलमानांचा आहे, पंजाबप्रांत शिखांचा आहे कीं मुसलमानांचा आहे, बंगालप्रांत हिंदु-राज्यांत असावा कीं पाकिस्तानांत असावा, हे सर्व वाद खोटे आहेत. यांतून निर्माण होणारे कलह हे खरे धर्मकलह नव्हेत. या लढ्यांत भाग घेणारे दोन्ही पक्षांचे लोक खरा धर्म जाणीत नाहींत. खरा वाद हिंदुस्थानांत, पंजाबांत व बंगाल्यांत संस्थानिक, जमीनदार, कारखानदार यांचें राज्य असावें, कीं तेथील शेतकरी-कामकरी यांचें असावें एवढाच आहे. हें सत्य जो जाणतो तो समाजवादी बनतो. म. गांधी बंगालमध्यें गेले व तेथें गेल्यावर त्यांना जमीनदार व शेतकरी यांच्यांतील लढा दिसून आला. त्यांनीं तिभागा-चळवळीला आपला आशीर्वाद दिला. जमीनदार वर्गाला आजपर्यंत शेतकऱ्यांकडून उत्पन्नाचा निम्मा भाग मिळत होता. तो फक्त तिसराच भाग यापुढें मिळावा असें शेतकरी म्हणूं लागले आहेत. यालाच तिभागा-चळवळ असें तिकडे म्हणतात. म. गांधींनीं या चळवळीला आपले आशीर्वाद दिले. बंगालमधील हिंदू जमीनदारांनीं ही चळवळ हिंदू विरुद्ध मुसलमान अशी आहे असें पटविण्याचा प्रयत्न केला, पण म. गांधींना तें पटलें नाहीं. त्यांनीं या चळवळीकडे जमातवादी दृष्टीनें बघूं नका, ती आर्थिक समतेची चळवळ आहे, असें समजावून दिलें. जमिनीची खरी मालकी जमीनदाराची नसून ती शेतकऱ्याची आहे असेंहि पण म. गांधी म्हणतात. हा समाजवादी युगधर्माचाच प्रभाव आहे. राष्ट्रसभेलाहि हें तत्त्व मान्य करावें लागलें असून स्वतंत्र हिंदुस्थानांत एकहि कारखानदार, जमीनदार किंवा सावकार राहणार नाहीं असें राष्ट्रसभेचे अध्यक्ष आचार्य कृपलानी यांनीं परवां स्पष्टपणें सांगितलें आहे.

## धर्मराज्यांत धनिकवर्ग नसेल

येशू ख्रिस्त म्हणत असे कीं, एक वेळ सुईच्या नेढ्यांतून उंट जाऊं शकेल, पण परमेश्वरी साम्राज्यांत धनिकाला प्रवेश करतां येणार नाहीं. म. गांधींच्या रामराज्यांतहि धनिकाला स्थान राहणार नाहीं. माझ्या राज्यांत एकहि चोर नाहीं, एकहि जार नाहीं, एकहि जारिणी नाहीं, एकहि मद्यपी नाहीं, एकहि कद्रू नाहीं, असें आपल्या राज्याचें वर्णन केल्याचें उपनिषदांत

वर्णिलें आहे. त्याच प्रमाणें माझ्या राज्यांत एकहि धनिक नाहीं, कारखानदार नाहीं, जमीनदार नाहीं, सावकार नाहीं, असें वर्णन आम्हांस करतां आलें पाहिजे. या धर्मराज्याच्या स्थापनेसाठीं जें युद्ध करावें लागणार आहे, त्याला वर्गयुद्धाचें स्वरूप येत आहे. म्हणून समाजवाद हाच आजचा युगधर्म असून त्यासाठीं जें वर्गयुद्ध करावें लागणार आहे तेंच आजचें धर्मयुद्ध होय. या वर्गयुद्धाची तीव्रता वाढेल, तर आज जें हिंदू-मुसलमान-शीख यांचें खोटें धर्मयुद्ध पंजाबसारख्या प्रांतांत पेटत आहे, तें शांत होईल व खरें धर्मराज्य स्थापन होऊन हिंदु-मुसलमान व शीख हे सर्व धर्म सत्याचा, अहिंसेचा व संयमाचा एकत्र उपदेश करीत असतात, हें मत तेथिल शेतकरी वर्गाला समजूं लागेल व सर्वत्र शांतता नांदूं लागेल.

★

# सत्याग्रह आणि वर्गयुद्ध : : प्रवचन ६ वें

आज जगांतील प्रत्येक देशांत मालक आणि मजूर किंवा धनिक व श्रमिक अथवा भांडवलदार व कामगार यांच्या दरम्यान जो लढा चालू आहे तो एक अन्याय विरुद्ध न्याय, अनीति विरुद्ध नीति अथवा अधर्म विरुद्ध धर्म यांच्यांतील लढा आहे; आणि त्यांतील मजुरांचा, श्रमिकांचा अथवा कामगारांचा पक्ष हा न्यायाचा, नीतीचा अथवा धर्माचा पक्ष आहे; हें सत्य ओळखिल्या-वांचून कोणासहि आपले सार्वजनिक व्यवहार योग्य प्रकारें करतां यावयाचे नाहींत. याचा अर्थ मजूर, श्रमिक आणि कामगार हे या लढ्यांत जें जें करतात, बोलतात किंवा मानतात तें तें सर्व न्यायाचें, नीतीचें किंवा धर्माचें असतें असा होत नाहीं. पांडवांनीं कौरवांविरुद्ध जें युद्ध केलें, तें धर्मयुद्ध होतें असें म्हटल्यानें पांडवांची सर्व कृति, उक्ति किंवा भावना नेहमींच धर्माची होती असा अर्थ होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें कामगारांचा पक्ष हा न्यायाचा नीतीचा व धर्माचा पक्ष आहे असें म्हटल्यानें त्यांची किंवा त्यांच्या वतीनें बोलणारांची प्रत्येक कृति, उक्ति व भावना न्यायाची, नीतीची अथवा धर्माची असते असा अर्थ होऊं शकत नाहीं. आजच्या जगांतील वर्गयुद्ध हें धर्मयुद्ध आहे या म्हणण्याचा एवढाच अर्थ आहे, कीं देशांतील राज्यकारभार भांडवलदार वर्गाच्या हातीं न ठेवतां तो शेतकरी-कामकरी म्हणजेच कामगार वर्गाच्या हातीं द्यावा आणि समाजावर त्या वर्गाचें राज्य चालूं लागावें. हें मत न्यायाचें, नीतीचें व धर्माचें आहे; इतकेंच नव्हे, तर याच्या पुढें जाऊन असेंहि आपण आज मानूं लागलें पाहिजे कीं, आज जर समाजांत या कष्टजीवी वर्गाचें राज्य

स्थापन झालें नाहीं, तर समाजाची धारणा हें जें धर्माचें एक ध्येय आहे, तेंहि साध्य होणार नाहीं. जो व्यवहार केवळ अन्यायाचा आहे, एवढेंच नव्हे, तर जो व्यवहार बंद झाल्यावांचून समाजाची धारणाच होऊं शकत नाहीं किंवा त्याची जीवितयात्राच चालूं शकत नाहीं, तो व्यवहार बंद न करणें हा केवळ अन्यायच नव्हे, तर तें समाजघाताचें पाप आहे. अर्थात् अशा अन्यायाविरुद्ध समाजाचें सर्व बल खर्ची घालून लढणें हें त्यांतील प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य आहे. ती व्यक्ति जर सत्याग्रही असेल, तर तिनें या लढ्याला अहिंसक स्वरूप कसें देतां येईल याचा विचार केला पाहिजे आणि त्यांतील न्यायाचा, नीतीचा व धर्माचा असा जो पक्ष असेल, त्या पक्षाच्या बाजूस समाजांतील सर्व संघटित आत्मबल आणून उभें केलें पाहिजे. जर हिंदुस्थानांतील सत्याग्रही आपलें व समाजाचें सर्व संघटित आत्मबल येथील शेतकरी-कामकरी वर्गाच्या पाठीमागें आणून उभें करतील, तर त्यांना या देशांत थोड्याच काळांत शेतकरी-कामकरी राज्य स्थापन करून सत्याग्रही समाजवाद म्हणजे काय, तें जगाला दाखवून देतां येईल. असें ते करतील तर त्यांनाहि क्रांतीसाठीं हिंसक व अत्याचारी मार्गाचा अवलंब करावा लागणार नाहीं.

## राज्यसंपादनाचा लढा

आज आपल्या देशांत एक सर्वांगीण क्रांति घडत आहे. सुमारें दीडशें वर्षें या देशावर ज्या सत्तेनें सार्वभौमत्व गाजविलें, ती सत्ता म्हणजे ब्रिटिश साम्राज्यसत्ता आज लोप पावत आहे. आपल्या हातची ही सत्ता कोणाच्या हातीं जाणार याचा विचार ब्रिटिश मुत्सद्दी करीत आहेत. त्याचप्रमाणें ब्रिटिशांची सार्वभौम सत्ता आपल्या हातीं यावी याबद्दल या देशांतील निरनिराळे पक्ष, त्या पक्षांच्या मागें उभे असणारे निरनिराळे वर्ग अथवा गट खटपट करीत आहेत. या सर्व पक्षांत कॉंग्रेस व मुस्लीम लीग हे दोन पक्ष प्रमुख असून लीगच्या मागें मुसलमान संस्थानिक, मुसलमान जमीनदार आणि मुसलमान व्यापारी-कारखानदार हे वर्ग गोळा होऊन हिंदुस्थानांत एक पाकिस्तान स्थापन करण्याचा प्रयत्न करीत आहेत. मुसलमानी जनतेंतील विकृत व मागासलेल्या धर्मवेडास चालना देऊन आपला हा हेतु साध्य होईल अशी लीग-पुढाऱ्यांस आशा आहे. तसेंच आपल्या या कपट-कारस्थानास ब्रिटिश व अमेरिकन भांडवलदारांचाहि पाठिंबा आपण मिळवूं शकूं असा लीग-पुढाऱ्यांना भरंवसा

वाटत आहे. याच्या उलट, कॉंग्रेसमध्यें आपलें वर्चस्व प्रस्थापित करतां आल्यास ब्रिटन-अमेरिका या राष्ट्रांतील भांडवलदार लोकशाहीप्रमाणें आपल्याहि देशांत एक भांडवलदार लोकशाही स्थापन करतां येईल, अशी आशा धरणारा हिंदी भांडवलदार वर्ग आहे. राष्ट्रसभेंत समाजवादी पक्षाचें वर्चस्व होऊं नये, राष्ट्रसभेनें स्वातंत्र्य-संग्रामांत प्राप्त करून घेतलेली पुण्याई हिंदी समाजवादाला प्राप्त करून घेतां येऊं नये आणि या राष्ट्रीय संस्थेचीं सूत्रें त्या पक्षाच्या हातीं जाऊं नयेत असे प्रयत्न या वर्गाकडून होत असतात. सत्याग्रह, अनत्याचार व अहिंसा या तत्त्वांची घोषणा करीत असूनहि राष्ट्रसभेनें देशांतील सत्ता आपल्या हातीं घ्यावी आणि आपल्या विरोधी पक्षांना झोडपून काढावें असें यांचें धोरण असतें. शांततारक्षण व शिस्त-पालन या दोहोंच्या नांवानें होणारी हिंसा त्यांना भयावह वाटत नाहीं. सत्याग्रही अहिंसावादाचें हें अत्यंत विकृत स्वरूप आहे. राष्ट्रसभेनें अधिकार ग्रहण केलें, कीं तिच्या धोरणावर या विचारांची दाट छाया पडूं लागते. या छायेचें निवारण करून ब्रिटिशांच्या हातची सत्ता हिंदुस्थानांतील भांडवल-दारांच्या, जमीनदारांच्या व संस्थनिकांच्या हातीं जाऊं देऊं नये आणि ती येथील शेतकरी-कामकरी वर्गाच्या हातींच जावी, याबद्दल सतत प्रयत्न करणारे समाजवादी पुढारीहि राष्ट्रसभेंत आहेत. राष्ट्रसभेनें या पुढाऱ्यांचें नेतृत्व स्वीकारावें आणि समाजवादाचा उघड पुरस्कार करून देशांत निर्माण होणारें नवें राज्ययंत्र आपल्या हातीं घ्यावें, असेच प्रयत्न तिच्यांतील सत्याग्रही पुढाऱ्यांनीं केले पाहिजेत.

## सत्याग्रह व सत्तायोग

सत्याग्रही पुढारी स्वतः सत्ताधारी होऊं शकत नाहींत, इतकेंच नव्हे, तर सत्ताधारी पक्षाला कराव्या लागणाऱ्या हिंसेचेंहि समर्थन ते करूं शकत नाहींत. राष्ट्रसभा मात्र आज देशांत चालू असलेल्या व चालू राहणाऱ्या सत्ता-संपादनाच्या लढ्यापासून अलिप्त राहूं शकत नाहीं. अशा परिस्थितींत शेतकरी-कामकरी वर्गाच्या वतीनें सत्ता ग्रहण करण्याचें धोरण ज्यांना मान्य आहे व जे लोकशाहीला दगा देणार नाहींत अशा पुढाऱ्यांच्या हातीं राष्ट्रसभा देऊन समाजवादी बनलेली ही राष्ट्रसभा या देशांत ब्रिटिशानंतर सार्वभौम बनेल, असा प्रयत्न सत्याग्रहींनीं केला पाहिजे. सत्याग्रही व गांधीवादी हे सत्ता काबीज

करण्याच्या लढ्यांत सामील होऊं शकणार नाहींत हें जितकें खरें आहे, तितकेंच हें खरें आहे, कीं सत्ता काबीज करणारी राष्ट्रसभा समाजवादी बनेल तरच या देशांत शेतकरी-कामकरी राज्य निर्माण होऊन लोकशाही समाजवाद स्थापन केल्याचें श्रेय या भरतखंडास मिळेल. असें होण्यावरच भारतीय संस्कृतीचें उज्ज्वल भवितव्य अवलंबून आहे. आपल्या देशांत निर्माण होणाऱ्या व झालेल्या वर्गयुद्धांतून हिंसा व अत्याचार यांचा प्रादुर्भाव होऊं नये, हें सत्याग्रही ध्येय अमलांत आणण्याचा हाच एक मार्ग आज उपलब्ध आहे.

★

# सत्याग्रहाचा अखंड क्रांतियज्ञ : :

प्रवचन ७ वें

हिंदी राष्ट्र स्वातंत्र्याच्या अगदीं नजीक येऊन ठेपलें आहे. ब्रिटिशांनीं १९४८ च्या जूनपर्यंत आपण या देशांतील आपल्या साम्राज्याचें पूर्ण विसर्जन करणार असल्याचें जाहीर केलें आहे. राष्ट्रसभेचे प्रमुख नेते दिल्लीच्या हंगामी सरकारवर ताबा अथवा हुकमत चालवूं लागले आहेत. कदाचित् लवकरच या हंगामी सरकारला सार्वभौम अधिकार देऊन ब्रिटिश सरकार या देशांतून चालतें होईल आणि आतां आपल्या देशाची कायमची राज्यघटना तुमची तुम्ही बनवा असेंहि सांगून जाईल. अर्थात् असें होतांच हिंदुस्थानांतून परकीय सत्तेला हांकलून देणें हें राष्ट्रसभेच्या कार्यांपैकीं जें एक प्रमुख कार्य तें पूर्ण झालें, असें मानतां येईल. पण तेवढ्यानें हिंदी जनतेला स्वातंत्र्य मिळवून देणें हें जें राष्ट्रसभेचें ध्येय, तें सफल झालें असें म्हणतां येणार नाहीं.

## राष्ट्रसभेची परंपरा

राष्ट्रसभेची परंपरा पाहिली तर केवळ इंग्रजांना या देशांतून हांकलून देणें एवढेंच संकुचित ध्येय तिच्यापुढें कधींहि नव्हतें. हिंदी जनतेला आधुनिक राष्ट्रवाद शिकविणें, धर्मभेदातीत व जातिभेदातीत होऊन राष्ट्रसेवा करण्यास लोकांना शिकविणें, प्रजासत्तेचें महत्त्व जनतेला पटवून देणें, राष्ट्रिकांच्या मूलभूत हक्कांची जाणीव त्यांना करून देणें, या हक्कांसाठीं कोणत्याहि सरकारशीं अनत्याचारी वृत्तीनें कसें लढावें हें जनतेला दाखवून देणें आणि आपल्या

देशांत खरी लोकशाही स्थापन करणें, अशीं एकाहून एक श्रेष्ठ अशीं अनेक ध्येयें राष्ट्रसभेनें आपल्या ठरावांत जाहीर केलेलीं आहेत. हीं ध्येयें तिच्या जन्मापासूनच्या ठरावांत आणि त्या ठरावावर तिच्या नेत्यांनीं केलेल्या भाषणांत ग्रथित झालेलीं आहेत. अर्थात् इंग्रज या देशांतून गेले म्हणजे आमचें क्रांतिकार्य संपलें आणि म्हणून जनतेनें आपल्या तलवारी आतां म्यान कराव्यात किंवा त्या तलवारींचे नांगर बनवावेत, असें कोणाहि खऱ्या राष्ट्रसभाभक्तास म्हणतां येणार नाहीं.

## म. गांधी व पं. नेहरू

पण गेल्या पंचवीस वर्षांत ज्या दोन थोर विभूतींनीं राष्ट्रसभेचें नेतृत्व केलें, त्यांच्या स्वातंत्र्याच्या कल्पना जर आपण पाहिल्या, तर या देशांतून इंग्रज गेल्यानंतरच येथील जनतेच्या खऱ्या क्रांतीस प्रारंभ होणार आहे, हें आपल्या सहज ध्यानांत येईल. समाजवाद्यांना या देशांत शेतकरी-कामकरी वर्गाचें लोकशाही राज्य स्थापन करावयाचें आहे. ब्रिटन व अमेरिका या देशांतील भांडवलदार लोकशाही ही खरी लोकशाही नसून ती धनिकशाही आहे असें समाजवाद्यांचें निश्चित मत आहे. म. गांधीनाहि शेतकरी-कामकरी राज्यच हवें आहे; पण तें शुद्ध अहिंसेनें व आत्मबलानें चालणारें हवें आहे. या राज्यांत शांततारक्षण व राष्ट्ररक्षण यासाठींहि हिंसा करावयास लागूं नये अशी त्यांची इच्छा आहे. त्या दृष्टीनें समाजांत जितकी संघटित अहिंसा निर्माण व्हावयास हवी तितकी अद्यापि झालेली नाहीं. आजच्या समाजांत चोरी आणि संग्रह यांची एकसारखी वाढ होत आहे. केवळ रात्रीं जाऊन घर फोडणें एवढा एकच चोरीचा प्रकार आज उरलेला नाहीं. हा चोरीचा प्रकार आतां फारच जुना झालेला आहे. व्यापार, सावकारी, जमीनदारी आणि कारखानदारी असे चोरीचे कायदेशीर प्रतिष्ठित मार्ग ज्यांना उपलब्ध आहेत, ते या जुन्या धोक्याच्या व अडाणी मार्गानें धनसंग्रह करण्याचें पसंत करीत नाहींत. त्यांनीं संग्रहाचे उघड, कायदेशीर आणि प्रतिष्ठित मार्ग शोधून काढिले आहेत. हे सर्व मार्ग अन्यायाचे, परपीडेचे आणि परवंचनेचे आहेत, याबद्दल आतां शहाण्या लोकांत मतभेद उरलेला नाहीं. आजच्या समाजांत जो धनसंग्रह होतो, तो कायदेशीर चोरीवांचून म्हणजे दुसऱ्याच्या कष्टाचें फळ लुबाडण्यावांचून होत नाहीं, आणि अशा चोरीच्या संग्रहाचें रक्षण हिंसेवांचून होऊं शकत नाहीं,

याबद्दलहि गांधीवादी व समाजवादी यांचा मतभेद होण्याचें कारण नाहीं. धनिक वर्गाची ही कायदेशीर चोरी कशी थांबवावी आणि त्यांनीं केलेला संग्रह सार्वजनिक मालकीचा कसा बनवावा, हा एकच प्रश्न आज जगांतील प्रत्येक राष्ट्रापुढें उभा आहे. खाजगी संग्रह नष्ट करणें याचेंच नांव समाजवाद होय. सर्व जमिनी, कारखाने, खाणी, सार्वजनिक मालकीखालीं आणणें आणि त्यांचें नियंत्रण सरकारमार्फत करणें हेंच समाजवादाचें ध्येय आहे. असें करण्यानेंच जनतेच्या कष्टांतून निर्माण होणारी संपत्ति तिला सुखानें भोगतां येईल. ही एक समाजक्रांति आहे व ही समाजक्रांति घडून आल्यावांचून जनतेचें स्वातंत्र्य प्राप्त झालें, खरी लोकशाही निर्माण झाली, अथवा प्रत्येकाला आपल्या कष्टार्जित संपत्तीचा उपभोग घेण्याची शाश्वती व आपल्या सर्व सत्प्रवृत्तींच्या विकासाचें स्वातंत्र्य मिळालें, असें म्हणतां येणार नाहीं.

## राज्यदंड गळून पडला पाहिजे

वर जी सामाजिक क्रांति सांगितली, ती क्रांति घडून आल्यानंतर आजच्या समाजांतील कायदेशीर चोरी व खाजगी संग्रह नष्ट होईल वें मगच सामान्य लोकांतील सत्यनिष्ठा, अहिंसावृत्ति आणि असंग्रह-प्रवृत्ति यांची वाढ होऊं शकेल, असें समाजवादाचें म्हणणें आहे. समाजवादालाहि म. गांधींचें सत्ययुगाचें, दंडहीन समाजाचें ध्येय मान्य आहे. पण तें प्राप्त होण्यापूर्वी भांडवलदारी लोकशाहींतून समाजवादी लोकशाहींत आपणांस गेलें पाहिजे. खाजगी व्यक्तीला व्यापार, सावकारी, जमीनदारी व कारखानदारी करण्यास कायद्यानेंच बंदी केली पाहिजे. द्रव्यसंग्रहाचे हे मार्ग खाजगी व्यक्तींना जेव्हां मोकळे ठेवण्यांत आले त्यावेळीं हे मार्ग इतके परपीडक, इतके अन्यायाचे वा इतके अधर्माचे बनले नव्हते व ते तसे बनतील अशी कोणास कल्पनाहि नव्हती. आज ही पीडा, हा अन्याय व हा अधर्म जनतेला असह्य झाले आहेत. कष्ट करणारांना जीविताची व वित्ताची शाश्वती उरलेली नाहीं आणि धनसंग्रह करणारांच्या संग्रहाला मर्यादा उरलेली नाहीं. हा संग्रह तुम्ही आपण होऊन समाजाच्या हवालीं करा हा उपदेश ऐकण्यास कोणी तयार नाहीं; तो आतां कायद्यानेंच बंद केला पाहिजे. हे कायदे जलद केले तरच ते लोकशाही पद्धतीनें होऊं शकतील व हिंदी समाजवाद लोकशाही स्वरूपाचा राहील. नाहीं तर रशियाप्रमाणें या देशांत शेतकरी-कामकरी वर्गाच्या राज्याला हुकूमशाहीचें स्वरूप येईल. हें हिंसक व

विकृत स्वरूप आपल्या समाजवादाला प्राप्त होऊं नये अशी हिंदी समाजवाद्यांची इच्छा व खटपट आहे. म. गांधींच्या शिकवणुकीचा हा प्रभाव आहे. अशा लोकशाहीच्या मार्गानें हिंदुस्थानांत समाजवादी राज्य स्थापन झालें, तर म. गांधींना राज्यदंडहि उपयोगांत न येतां समाज चालावा असें जें वाटतें, तें अमलांत येण्याचाहि मार्ग हळूहळू दिसूं लागेल. पण सत्ययुग संस्थापनेचें हें ध्येय फार दूरचें आहे. तें दृष्टीच्या आटोक्यांत येण्यापूर्वी समाजांतील चोरी व संग्रह यांना आळा पडला पाहिजे व तो समाजवादाच्या प्रस्थापनेनेंच पडूं शकेल, हें राष्ट्रसभेनें मान्य केलें पाहिजे. पंडित नेहरू व भाई जयप्रकाश हे राष्ट्रसभेला हेंच वळण लावीत असून म. गांधींचें अंतिम ध्येय याच मार्गानें जवळ येऊं शकेल.

## अंतिम ध्येय

तथापि, समाजसत्ताक लोकशाही हेंहि सत्याग्रही क्रांतीचें अंतिम ध्येय नाहीं. अशा राज्यसंस्थेचाहि दंड गळून पडावा अशी सतत खटपट करणारे, क्रांतिकारक अहिंसावादी अशा समाजसत्ताक लोकशाही राज्यांतहि अधिकारावर चढूं इच्छिणार नाहींत. अधिकार, सत्ता व संपत्ति यांचा सदैव संन्यास करून केवळ अहिंसेनें व आत्मबलानें राज्यदंडाच्या अन्यायापासून आपलें रक्षण कसें करावें हें जनतेला आपल्या आचरणानें शिकवीतच ते राहतील. चोरांवरहि ते सक्ती करणार नाहींत आणि खुनी मनुष्यालाहि आत्मबलानेंच वश करण्याचा प्रयत्न करतील. हा त्यांचा क्रांतियज्ञ अखंड चालू राहील, तरच क्रांतियज्ञांतील हिंसा कमी कमी होत जाऊन अखेरीस ती पूर्णपणें नष्ट होईल. समाजांत खरी लोकसत्ता चालू राहण्यास सत्याग्रहींचा हा अखंड क्रांतियज्ञ सतत चालू राहिला पाहिजे. या क्रांतियज्ञाची ज्योत आज म. गांधी, खान अबदुल गफारखान अथवा महाराष्ट्रांत साने गुरुजी आज तेवत ठेवीत आहेत. क्रांतिनिष्ठेचें तेज अहिंसक आणि शीतल कसें ठेवावें, याची कांहींशी कल्पना आपणांस त्यांच्या सार्वजनिक हालचालीकडे पाहून येऊं शकते.

★

# सत्याग्रह, क्रांति आणि समाजधारणा

प्रवचन ८ वें

जगतांत स्थिर, न पालटणारें, अक्षर असें कांहीं नाहीं. नित्य परिवर्तन हाच जगाचा स्वभाव आहे. यालाच जग नश्वर आहे असें लोक म्हणतात. पण जग नश्वर आहे असें म्हणण्यापेक्षां जगांतील प्रत्येक वस्तु नश्वर आहे, असें म्हणणें अधिक योग्य होईल. जगांतील प्रत्येक वस्तु अंत पावणार आहे हें जितकें खरें आहे, तितकें हेंहि खरें आहे कीं जगांत प्रत्येक क्षणीं नव्या वस्तू जन्मास येत आहेत व म्हणून जग शाश्वत आहे. जगाला मृत्युलोक जसें म्हणतां येतें, तसें त्याला जन्मलोक असेंहि म्हणतां येतें. जन्म आणि मृत्यु हीं दोनहि जेथें आहेत, त्याल आपण केवळ मृत्युलोकच कां म्हणावें? ही आमची एकांगी, निराशावादी, विकृत दृष्टि आहे. जग नित्य मरत आहे, तसें तें नित्य जन्मत आहे असेंहि आपणांस दिसतें. जगांत दुःख आहे तसें सुखहि आहे हें खरें आहे; पण या सुखदुःखांच्या पलीकडे जाऊन दुःखांतहि ज्या आनंदाला, शांतीला अथवा समाधानाला खंड पडणार नाहीं असा आनंद, अशी शांति, असें समाधान जगांत आहे हें त्याहूनहि खरें आहे. यालाच अमृत, अमरपद असें म्हणतात. हें अमृतत्व कसें प्राप्त करून घ्यावें तें दाखवून देण्यासाठीं निरनिराळे धर्म निर्माण झालेले आहेत. तसाच आज एक सत्याग्रहधर्म निर्माण होत आहे. वस्तुतः सत्याग्रहधर्म हा नवा धर्म नसून आजपर्यंत होऊन गेलेल्या सर्व धर्मांचें रहस्य ज्यांत सांठविलेलें आहे असा तो एक सनातन धर्म आहे, असेंहि म्हणतां येईल. सत्य, अहिंसा आणि तप

हींच सर्व धर्मांचीं तीन मुख्य रहस्यें आहेत, असें सत्याग्रहधर्म मानतो आणि म्हणून आजपर्यंत होऊन गेलेल्या सर्व धर्मांकडे तो अद्वैत दृष्टीनें अथवा सम दृष्टीनें पाहतो. "सर्व धर्मीं समानत्व" हें सत्याग्रही व्यक्तीचें एक अवश्य व्रत गणलें जातें. या दृष्टीनें सत्याग्रह हा एक शाश्वत, अक्षर असा सनातन धर्म म्हणतां आला, तरी तो एक क्रांतिधर्म आहे हेंहि विसरतां कामा नये. जग शाश्वत असलें तरी त्यांतील प्रत्येक वस्तु नश्वर आहे हें जसें खरें, तसें या जगाचें ज्ञान करून घेण्याची वृत्ति ही मनुष्य-समाजाइतकी शाश्वत असली, तरी मनुष्याचें ज्ञान हें नित्य पालटणारें आहे व त्यांत एकसारखी भर पडत राहिली पाहिजे, अशी सत्याग्रहीची जिवंत सत्यनिष्ठा असली पाहिजे. कोणत्याहि शास्त्राचें आजपर्यंतचें ज्ञान अशाच सत्यनिष्ठेनें वाढत आलेलें आहे व तें तशाच सत्यनिष्ठेनें यापुढेंहि वाढत राहिलें पाहिजे, ही सत्याग्रहीची नवी दृष्टि होय. मनुष्याला आतांपर्यंत प्राप्त झालेलें कोणतेंहि ज्ञान पूर्ण नाहीं आणि म्हणून अपूर्ण ज्ञानां-तून पूर्णत्वाकडे जाण्याची त्याची सत्यानिष्ठेची व सत्यसंशोधनाची सनातनवृत्ति एकसारखी जिवंत आणि प्रभावी ठेविली पाहिजे. यामुळें त्याचे विचार हे एकसारखे वाढत व पालटतच राहणार. क्षर जगांतील कोणताहि विचार अक्षर असूं शकत नाहीं. विचार हा वस्तुनिष्ठ असून वस्तूचें आकलन करण्यासाठीं आहे. अर्थात् वस्तूचें स्वरूप पालटेल त्याप्रमाणें तिचें आकलन करणाऱ्या विचाराचें स्वरूपहि पालटतच गेलें पाहिजे. वस्तुसृष्टीचें प्रतिबिंब विचारसृष्टींत पडलें पाहिजे आणि विचारसृष्टीचा प्रभाव वस्तुसृष्टीवर चालला पाहिजे. म्हणून वास्तव सृष्टींतील बदलाबरोबर मनुष्याच्या विचारसृष्टींतहि बदल घडलाच पाहिजे; नाहीं तर त्याच्या विचारसृष्टीचा प्रभाव वास्तवसृष्टीवर चालूं शकणार नाहीं. यामुळें वास्तवसृष्टींतील पालटांप्रमाणें विचारसृष्टींतहि पालट होत असल्यामुळें सत्याग्रहीला आपली सत्यनिष्ठा जिवंत ठेवण्यासाठींच विचारसृष्टींत नित्य क्रांति करणें भाग आहे. समाजधारणा हें एक धर्माचें अंग आहे असें नेहमीं सांगण्यांत येत असतें; पण ही समाजधारणा त्या समाजांतील सत्यसंशोधनावर म्हणजेच सत्याग्रह-निष्ठेवर अवलंबून असते, ह्याचें ज्ञान आम्हांस असत नाहीं. समाजांतील सत्यसंशोधनाला खंड पडला, तर त्याची विचारसृष्टि योग्य तऱ्हेनें बदलत जाणार नाहीं; आणि अर्थात् त्यांत घडणारे

आचारहि योग्य प्रकारें घडणार नाहींत अथवा त्यांना योग्य दिशा लागणार नाहीं. म्हणूनच सत्यसंशोधनाचा यज्ञ समाजांत अखंड चालू राहिला पाहिजे.

## सत्यसंशोधानाचीं तीन क्षेत्रें

समाजधारणेला आवश्यक असें जें सत्यसंशोधन, त्याचीं मुख्यतः तीन क्षेत्रें आहेत; व या तीनहि क्षेत्रांतील संशोधनक्रियेवर मनुष्य-समाजाची धारणा, उन्नति आणि शांति हीं अवलंबून असतात. भौतिक सृष्टीची घटना कशी आहे, आणि त्या घटनेपासून आपलें हित करून घेण्यासाठीं कोणते उपाय योजावेत, हें ज्ञान वाढविण्याचें कार्य भौतिक शास्त्रें करीत असतात. आपल्या बाह्येंद्रियांनीं जें ज्ञान आपणांस होत असतें, त्या ज्ञानाच्या आधारावर भौतिक क्षेत्रांतील सत्यसंशोधन चालू असतें. सूर्य पृथ्वीभोवतीं फिरतो कीं पृथ्वी सूर्याभोवतीं फिरते, हें ज्ञान भौतिक क्षेत्रांत येतें. सूर्य पृथ्वीभोवतीं फिरत नसून पृथ्वी सूर्याभोवतीं फिरते ह्या सिद्धांताचा प्रचार केल्याबद्दल इ. स. १६०० सालीं युरोपखंडांत गिऑरडानो ब्रूनो या सत्याग्रहीस धर्माधिकाऱ्यांनीं जिवंत जाळलें! परंतु त्यानें या भौतिक सत्यसंशोधनाची आपली निष्ठा सोडिली नाहीं. जाळून मारण्याची शिक्षा त्याला देण्यापूर्वीं या धर्माधिकाऱ्यांनीं त्याला सात वर्षें कैदेंत ठेविलेलें होतें आणि 'तूं आपला आग्रह सोड म्हणजे तुला बंधमुक्त करूं' अशी त्याला लालूच दाखविण्यांत आली होती. पण त्यानें आपली सत्यनिष्ठा या बाबतींत सोडली नाहीं. अखेरीस त्यानें स्वतःचा देह जाळण्यास संमती दिली. त्याच्या या सत्याग्रहनिष्ठेतूनच आधुनिक युरोपचा जन्म झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. भौतिक सत्य-संशोधनसाठीं आपल्या देहाची चिता त्यानें पेटवून घेतली, पण अखेरीस मध्ययुगीन धर्म-कल्पनांचीच ती चिता ठरली! यानंतर गेल्या तीनशें वर्षांत जगाच्या भौतिक ज्ञानांत आणि त्याचबरोबर सामाजिक व आत्मिक ज्ञानांतहि फार मोठी भर पडलेली आहे.

## सामाजिक सत्य

भौतिक सत्याचें संशोधन करण्यासाठीं सत्याग्रही वृत्तीची कशी आवश्यकता लागते त्याचें हें उदाहरण झालें. सत्यसंशोधनाचें दुसरें क्षेत्र म्हणजे सामाजिक शास्त्रें होत. या सामाजिक शास्त्रांत समाजांतील निरनिराळ्या

संस्थांची घटना कशी आहे व ती कशी असावी, यांचा विचार करण्यांत येत असतो. समाजांत राजसत्ता असावी कीं लोकसत्ता असावी, एकत्र कुटुंबपद्धति असावी कीं विभक्त कुटुंबपद्धति असावी, कारखाने-जमिनी यांच्यावर समाजाची मालकी असावी कीं व्यक्तीची असावी, इत्यादि प्रश्न हे समाजशास्त्राचे अथवा सामाजिक शास्त्रांचे विषय होत. या शास्त्रांचें ज्ञानहि एकसारखें वाढत असतें व वाढावें लागतें. त्यांत सत्यसंशोधनानें नवी भर टाकीत असतांना मनुष्याला सत्य काय व असत्य काय, खरें काय व आभास काय, याचा विचार करावा लागतो. त्याचबरोबर चांगलें व वाईट किंवा सत् व असत् याचाहि विचार करावा लागतो. हा सतासताचा विचार मनुष्याला नीतिशास्त्रांत घेऊन जातो. सदसद्विवेक म्हणजे चांगल्या-वाईटाचा विवेक. हा विवेक करतांना मनुष्याला केवळ सत्यनिष्ठा एवढाच सद्गुण पुरा पडत नाहीं. त्याच्या अंगीं प्रेम आणि संयम या गुणांचीहि आवश्यकता असते. कारण, चांगलें म्हणजे काय ? तर ज्याच्या योगानें सर्वांचें हित होईल तें चांगलें. अर्थात् स्वहितबुद्धीला बाजूस ठेऊन सर्वहितबुद्धीनें विचार करण्याची संवय् ज्याला नाहीं, तो सामाजिक शास्त्रांतील सत्य जाणूं शकत नाहीं व म्हणूनच त्याला सदसद्विवेकहि करतां येत नाहीं. असत्यालाच सत्य, अधर्मालाच धर्म, अनीतीलाच नीति अथवा स्वार्थालाच परमार्थ असें मानण्याकडे त्याची प्रवृत्ति असते. यासाठीं सदसद्विवेक करणाऱ्यानें निरहंकार आणि निर्भय बनून सर्वहितबुद्धीनें सत्याचा विचार करावयास हवा. अर्थात् या सामाजिक सत्याच्या संशोधनांत सत्यनिष्ठेबरोबरच प्रेम आणि संयम किंवा तपश्चर्या ह्या गुणांची अधिक आवश्यकता लागते. अर्थात् हें नवें सामाजिक सत्यसंशोधन झाल्यानंतर त्या सामाजिक सत्याची म्हणजेच न्यायासंबंधींच्या नव्या कल्पनांची संस्थापना करतांना सत्याग्रही मनुष्यास क्रांतिकारक बनावें लागतें. सत्यानेंच समाजधारणा होते, असा त्याचा दृढ विश्वास असल्यामुळें त्याची क्रांतिनिष्ठा आणि समाजधारणाबुद्धि यांत विरोध येण्याची गरज नाहीं. सामाजिक सत्य म्हणजेच न्याय, म्हणजेच सर्वहित असें समीकरण असल्यानें या नव्या सामाजिक सत्याची संस्थापना करण्यासाठीं जी क्रांति करावी लागेल, ती समाजधारणेसाठींच होय, असें त्यास वाटत असतें व ही क्रांति घडविण्यास जे विरोध करीत आहेत ते समाजधारणाधर्माचे शत्रू आहेत असें त्याला वाटतें.

अर्थात् या शत्रूंचाहि तो द्वेष करणार नाहीं ही गोष्ट निराळी. किंबहुना, असेंहि म्हणतां येईल कीं तो त्यांना स्वतःचे शत्रू न मानतां तेच त्याला स्वतःचा शत्रु समजतात. असो. अशा तऱ्हेनें सामाजिक क्रांतिकारक ज्या सत्यासाठीं क्रांति करीत असतो तें संशोधनाचें दुसरें क्षेत्र होय. या क्षेत्रांतील सत्याला आपण सामाजिक सत्य असें नांव देऊं. पहिलें भौतिक सत्य व दुसरें सामाजिक सत्य. तिसरें आत्मिक क्षेत्र आहे. त्या क्षेत्रांतील सत्यास आत्मिक सत्य असें नांव देतां येईल.

## आत्मिक सत्यसंशोधन

आतां आपण या आत्मिक क्षेत्रांतील संशोधनाचा थोडा विचार करूं. सामाजिक सत्याचा विचार करीत असतां नीतिशास्त्रांत शिरावें लागतें हें वर सांगितलेंच आहे. आतां या नीतिशास्त्रांतून मनुष्य आत्मशास्त्रांत म्हणजे आत्मिक सत्याच्या शास्त्रांत कसा जातो तें पहा. नीतिशास्त्राचा विचार करीत असतां आपल्या मनाचें व बुद्धीचें निरीक्षण व परीक्षण करावें लागतें. आपलें मन व बुद्धि म्हणजे आपल्या वासना, आपले विकार आणि आपले विचार. आपण जसें भौतिक सृष्टीचें निरीक्षण व परीक्षण करतों, तसेंच आपल्या विचारांचें, वासनांचें आणि विकारांचें निरीक्षण व परीक्षण आपणांस करतां येतें. आपल्या कोणत्या वासना चांगल्या आणि कोणत्या वाईट, आपले कोणते विकार चांगले व कोणते वाईट, तसेंच आपले कोणते विचार चांगले व कोणते वाईट, याचा विचार आपण करूं लागलों म्हणजे जशी एकादी बाह्य वस्तु आपल्या ज्ञानाचा विषय बनते, तसेंच आपलें मन व बुद्धि ही आपल्या ज्ञानाचा विषय बनतात; आणि या मनाचें व बुद्धीचें परीक्षण करणारा मी त्यांच्याहून भिन्न आहें असें क्षणभर वाटूं लागतें. यालाच आपण ज्ञाता व आत्मा अशीं नांवें देतों. या आत्म्याचें स्वरूप काय, म्हणजेच माझें स्वरूप काय, या विचारांतून अध्यात्मशास्त्राचा उगम होतो. या शास्त्रांतील सिद्धांतांना अत्मिक सत्यें असें म्हणतां येईल. या आत्मिक सत्याचा विचार करीत असतां माझा देह, माझें मन आणि माझी बुद्धि यांच्याशीं तादात्म्य पावणारा व तीं म्हणजेच मी, असें मानणारा एक 'मी' आहे. त्यालाच वेदांती लोक जीवात्मा असें म्हणतात. आणि माझा देह, माझी बुद्धि आणि माझें मन एवढाच मी नसून सर्व विश्वांत

घडामोडी करणारी जी एक शक्ति आहे, त्या शक्तीचाच मी एक अंश आहें; किंबहुना, ती शक्ति म्हणजेच मी असें मानणारा जो मी त्यालाच ते लोक परमात्मा असें नांव देतात. जीवात्म्यानें "माझा देह, माझी बुद्धि व माझें मन म्हणजेच मी" असें मानणें हा त्याचा भ्रम आहे; आणि या भ्रमांतून मुक्त होऊन सर्व विश्वाला व्यापून राहणारी व त्यांत अनंत घडामोडी करणारी अशी जी शक्ति ती मी, अशी वृत्ति आपल्या अंतःकरणांत बाणवून घ्यावी, हेंच वेदांती लोक या आध्यात्मिक क्षेत्रांतील अंतिम सत्य असें मानतात. अर्थात् हा अध्यात्मशास्त्रांतील सिद्धान्त सर्वांनाच मान्य आहे असें नाहीं. इतर शास्त्रांप्रमाणें या शास्त्रांतहि अनेकांनीं अनेक सिद्धांत मांडलेले आहेत. त्या सर्वांचें अध्ययन, परीक्षण आणि संशोधन करणें हें अध्यात्मशास्त्राचें ध्येय आहे. या शास्त्रांतील सत्य हेंच आत्मिक सत्य असें म्हणतां येईल. या आत्मिक क्षेत्रांतहि सत्याचें अखंड संशोधन चालू राहिलें पाहिजे आणि त्यांतील सिद्धांतहि अनुभवानें आणि अनुमानानें एकसारखे वाढत राहिले पाहिजेत, तरच मानव-संस्कृति खरी प्रगतीवर राहील; आणि मानव-समाजाची खरी धारणा होऊन त्याची अखंड उन्नति होत राहील.

गेल्या तीनशें वर्षांत भौतिक क्षेत्रांत आणि समाजिक क्षेत्रांत बरेंच नवें नवें संशोधन झालेलें आहे व आत्मिक क्षेत्रांतहि कांहीं थोडेसें झालेलें आहे. तथापि, भौतिक क्षेत्रांतील संशोधनाच्या मानानें सामाजिक क्षेत्रांत पडलेली भर फार थोडी आहे आणि आत्मिक क्षेत्रांत तर फारच थोडी भर पडली आहे. तथापि ती अगदींच पडलेली नाहीं असें नाहीं. इतर शास्त्रांप्रमाणें आध्यात्मिक शास्त्रहि वाढतें आणि संशोधनास व संवर्धनास पात्र आहे हा दृष्टिकोण प्राप्त होणें, हीच एक फार मोठी प्रगति असून इतर शास्त्रांतील प्रगति करीत असतांना जी नवी दृष्टि मानवाला प्राप्त झाली त्याचेंच हें एक फल आहे. तसेंच ईश्वरवाद, पुनर्जन्म, परलोक, जीवात्म-परमात्मसंबंध या विषयांतील सिद्धांत अनुभवानें पडताळून पाहतां येतील तरच ते मानावेत, अशी एक वृत्ति वाढत असून या क्षेत्रांत व्यक्तींना पूर्ण बुद्धिस्वातंत्र्य असावें हा सिद्धान्त बहुतेक सर्वमान्य झाला आहे. सत्य आणि प्रेम या तत्त्वांनुसार वागणारा मनुष्य निरीश्वरवादी असला, तरी तो सत्याग्रहीच मानला पाहिजे. खरी धर्मनिष्ठा ईश्वरवादांत किंवा परलोक व पुनर्जन्म यासंबंधीं विशिष्ट सिद्धान्त मान्य

करण्यांत नसून अहिंसावृत्तीनें सत्याची उपासना करण्यांत व त्यासाठीं भोगाव्या लागणाऱ्या क्लेशांना तुच्छ लेखून सत्यनिष्ठा जिवंत ठेवण्यांत आहे. ही वृत्ति म. गांधींच्या चारित्र्यापासून आज सर्व धर्मनिष्ठांत जागृत होत आहे. धार्मिक व सामाजिक क्षेत्रांतील निरनिराळया सिद्धान्तांच्या आग्रहाला वश होऊन परस्परांची हिंसा करणाऱ्या मानवाच्या खऱ्या उद्धाराचा व शाश्वत शांतीचा मार्ग दाखवून देण्याचें सामर्थ्य या वृत्तीच्या संवर्धनांतच आहे. आत्मिक सत्याचें संशोधन याच वृत्तीनें होऊं शकेल व त्यामुळेंच अध्यात्मशास्त्रांत नवी भर पडूं शकेल. आधुनिक भारतानें ही भर घालण्याचें कार्य गेल्या शें-सव्वाशें वर्षांत सुरू केलें असून म. गांधींचा सत्याग्रह हा त्यामुळेंच जन्मास आला आहे. परकीयांचें पारतंत्र्य नष्ट करण्याचें कार्य त्यानें संपवीत आणिलें असून स्वकीयांच्या पारतंत्र्यांतून मुक्त होण्याचा मार्ग त्याला यापुढें दाखवून द्यावयाचा आहे. तसें करतांना त्याला धर्म, रूढी व कायदे यांच्यावर आघातहि करावा लागणार आहे व सत्यासाठीं त्यांचें उल्लंघनहि करून सामाजिक क्रांति करावी लागणार आहे. भारतीय जनतेंत निर्माण झालेली ही आत्मशक्ति परकीयांप्रमाणें स्वकीयांच्या जुलुमाविरुद्धहि बंड व क्रांति केल्यावांचून राहणार नाहीं. परंपरागत धर्म, रूढी, कायदे व समाजघटना यांच्या बंधनांत ती क्रांति कोंडून ठेवण्याचा प्रयत्न केव्हांहि सफल होणार नाहीं. एकदां जागृत झालेली ही भारतीय शक्ति कोणत्याहि बाह्य बंधनांनीं जखडून राहून गुलाम राहणार नाहीं. सत्यासाठीं धर्माचें, समतेसाठीं सामाजिक बंधनाचें, आणि न्यायासाठीं कायद्याचें उल्लंघन करणें हें आपलें सर्वश्रेष्ठ कर्तव्य आहे व तें अनत्याचारी वृत्तीनें पार पाडण्यांतच खरा मोक्ष आहे, याची जाणीव आतां भारतीय जनतेला झाली आहे.

★

# समाजरक्षण आणि समाजक्रांति : :

प्रवचन ९ वें

## जीवन्मुक्त समाज

समाजधारणा करण्यासाठीं समाजांत अनेक वेळां क्रांति करावी लागते आणि जुनी समाजघटना मोडून नवी समाजघटना करावी लागते, हें आतांपर्यंत अनेक वेळां सांगितलें. आतां ही क्रांति कां व कशी करावी आणि या क्रांतिकार्यांत सत्याग्रहाचें स्थान किती महत्त्वाचें आहे त्याचा विचार करावयाचा आहे. व्यक्तीच्या जीवनांत त्याची शरीरधारणा करण्यास लागणाऱ्या अन्नाच्या प्रश्नाला जसें आद्य व महत्त्वाचें स्थान आहे तसेंच समाजधारणेंत त्याच्या आर्थिक व्यवहारांना आद्य व महत्त्वाचें स्थान असतें. समाजांतील आर्थिक व्यवहारं ज्या तत्त्वांनुसार चालल्यानें त्यांतील संपत्तीची वाढ होऊन तिचा उपभोग सर्वांना योग्य प्रकारें मिळेल तशी आर्थिक व्यवस्था समाजांत असावी लागते. व्यवस्था योग्य प्रकारें चालविण्यासाठीं तिला कायद्याचीं, नीतीचीं व धर्माचीं बंधनें घातलेलीं असून हीं बंधनें मोडणारांना शिक्षा, व ती विशेष प्रकारें पाळून समाजाच्या संपत्तींत विशेष भर टाकण्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मदत करणाऱ्यास कांहीं अमिष किंवा बक्षिस ठेवलेलें असतें. अशा शिक्षेच्या भीतीनें व बक्षिसाच्या आशेनें समाजसेवा करणें ही माणसाची सर्वश्रेष्ठ वृत्ति नव्हे. कोणत्याहि शिक्षेच्या भीतीनें किंवा बक्षिसाच्या लोभानें नव्हे, तर केवळ समाजावरील उत्कट प्रेमानें निष्काम, निर्लोभ व निर्भय वृत्तीनें जे समाजसेवा करतात, त्यांचा योगक्षेम चालविण्यास समाज नेहमींच तयार असतो व

त्याला स्वतःच्या जीवितयात्रेचा प्रश्न फारसा नडवूं शकत नाहीं. त्याच्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक सर्व शक्तींचा योग्य विकास होण्यास लागणारा उपभोग त्यानें घ्यावा यांतच त्याचें व समाजाचें हित आहे, असें समाजाला वाटत असतें आणि तोहि तेवढाच उपभोग घेऊन, आपल्या सर्व शक्ती समाजाला अर्पण करीत असल्यानें त्याला संग्रह करण्याची दुष्ट बुद्धि कधींच होत नाहीं अथवा कधीं झाली तर तो त्या दुष्ट बुद्धीचा संयम करतो. समाजांतील सर्वच लोक निष्काम, निर्लोभी व निर्भय बनून आपल्या सर्व शक्ती समाजाला अर्पण करतील व त्या शक्तींच्या विकासास अत्यंत अवश्य तेवढ्याच धनाचा उपभोग घेतील, तर त्या समाजांत व्यक्तिहित व समाजहित यांत द्वैत मुळींच राहणार नाहीं. प्रत्येकास आपापल्या गरजांप्रमाणें उपभोग घेतां येईल आणि प्रत्येकांकडून त्याच्या त्याच्या शक्तीनुसार समाजाची सेवा घडत राहिल्यानें सामाजिक संपत्तींत व संस्कृतींत एकसारखी भर पडत राहील. अशा समाजांतील आर्थिक घटना चालू राहण्यास कायद्याचें, रूढीचें किंवा धर्माचें बाह्य बंधन असण्याची गरजच उरणार नाहीं.

"स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः"

म्हणजे आपल्या कर्मानें समाजरूप ईश्वराची पूजा केली असतां आपणांस सिद्धि मिळते, म्हणजे आपले सर्व पुरुषार्थ सफल होतात, असा अनुभव त्या त्या समाजांतील सर्व व्यक्तींस अनायासें येत राहील. हा एक जीवन्मुक्तांचाच समाज बनेल आणि तो सर्व बाह्य बंधनांतून मुक्त होईल.

### बद्धांचा समाज

पण असा समाज आज तावडतोब स्थापन होणें शक्य नाहीं. आज व्यक्तीला लोभ आहे व भीतीला वश होऊन व्यक्ती वागत असतात. म्हणून चोरी करणारांस शिक्षा देण्याची व्यवस्था करावी लागते आणि जें काम करण्यास पुरेसे लोक तयार होत नाहींत त्यांना थोडा अधिक संग्रह करण्याची मुभा द्यावी लागते. धनार्जन कोणत्या मार्गानें करावें, कोणत्या व्यवहारांत किती धन मिळवावें, अथवा कोणत्या कामाला अथवा वस्तूला किती किंमत द्यावी, कोणत्या वस्तू खाजगी मालकीच्या असाव्यात, कोणता व्यापार वा धंदा खाजगी असावा व कोणता समाजानें करावा याबद्दल कायदे करावे लागतात, ते कायदे पाळणें हें कर्तव्य आहे असें नीतिशास्त्र शिकवावें लागतें. आणि

हीं कर्तव्यें पाळण्याचा धर्म निष्काम, निर्लोभ व निर्भय वृत्तीनें जो करतो, त्याला मोक्ष प्राप्त होईल असें अध्यात्मशास्त्रालाहि मान्य करावें लागतें. अशा प्रकारें समाजाच्या आर्थिक घटनेला कायदे, नीति, राज्य, धर्म व मोक्ष या सर्वांचा आधार द्यावा लागतो. समाजांतील सर्व व्यक्ती मुक्तावस्थेला गेल्या नाहींत आणि त्यांचे सर्व व्यवहार शुद्ध सत्यनिष्ठेनें, निःपक्षपाती प्रेमानें आणि संपूर्ण संयमानें होऊं लागले नाहींत, तोंपर्यंत कायद्याचीं, नीतीचीं व धर्माची बंधनें अजिबात नष्ट होणें शक्य नाहीं.

## क्रांति आणि निष्ठांतर

परंतु वरील प्रकारचीं बंधनें हीं चिरंतन नसतात. समाजाच्या ज्ञानांत, साधन-संपत्तींत व भोग-संपत्तींत जशी वाढ होत जाते, तशीं जुनीं बंधनें त्याचे व्यवहार नियंत्रित करण्यास अपुरीं भासूं लागतात व नवीं बंधनें निर्माण करावीं लागतात. समाजाच्या ज्ञानांत, धनांत, धन-संपादनाच्या प्रकारांत व प्रमाणांत वाढ होत असते. या वाढीबरोबर जुन्या व्यवहारांचे परिणाम बदलूं लागतात, त्यांचें स्वरूप पालटूं लागतें, आणि एके काळीं चांगले ठरलेले व्यवहार समाजाला घातक बनूं लागतात. अशा वेळीं समाजाच्या आर्थिक घटनेंत क्रांति घडवून आणावी लागते; किंबहुना, ती घडून येईपर्यंत जुनी समाजघटना चालणें अशक्य होऊन सर्वत्र अंदाधुंदी व अराजक माजूं लागतें. आज आपण अशाच क्रांतिकालांत नांदत आहोंत आणि या क्रांतींतून समाजवादी शेतकरी-कामकरी राज्य स्थापन होईपर्यंत ही अंदाधुंदी बंद होणें अशक्य दिसत आहे. जमिनी, कारखाने, आणि पेढ्या, मालाचा व पैशाचा व्यापार हे सर्व धंदे समाजानें आपल्या मालकीखालीं आणल्यावांचून समाजाच्या अन्न-वस्त्राचा व घरादारांचा प्रश्नहि सुटूं शकत नाहीं हें उघड दिसत आहे. म्हणूनच समाजवाद हा आजचा युगधर्म बनला आहे असें म्हणतात. या युगधर्माची स्थापना करण्यास जमीनदार, कारखानदार व सावकार या वर्गाचा म्हणजे भांडवलदारांचा विरोध आहे व शेतकरी-कामकरी वर्गाला आपली आपत्ति दिसत असली तरी त्या आपत्तीवर समाजवादी लोकशाही हाच एक निश्चित उपाय आहे अशी जाणीव झालेली नाहीं. त्याला अद्यापि जुन्या कायद्यांचा जुन्या नीतीचा, जुन्या धर्माचा मोह वाटत आहे व समाजवादी क्रांति न करतांहि आपली स्थिति सुधारूं शकेल अशी भ्रामक आशा वाटत आहे. भांडवल-

दारांचे पक्षपाती त्याची ही जुन्या धर्मावरील निष्ठा प्रज्वलित करून जनतेचें डोकें भडकवीत आहेत आणि धर्माच्या व जातीच्या नांवानें भांडणें वाढवून जुनी आर्थिक घटना म्हणजे भांडवलशाही सुस्थिर करूं पहात आहेत.

## जनतेचें हृदय-परिवर्तन

समाजवादी नव्या युगधर्मांची संस्थापना होण्यापूर्वी जनतेची जुन्या धर्मावरील निष्ठा बदलून नव्या समाजवादी युगधर्मावर निष्ठा निर्माण झाली पाहिजे. जुन्या निष्ठा बदलून नव्या निष्ठा निर्माण करण्यास समाजांत अनत्याचारी वातावरण निर्माण होऊन जनतेचें डोकें शांत राहिलें पाहिजे. पण ही शांति स्मशान-शांति असतां कामा नये. परंपरागत धर्म, रूढी व कायदे पाळणारी गुलामवृत्ति, पशुवृत्ति किंवा जडवृत्ति समाजांत निर्माण करणारी शांति नको आहे. सत्यनिष्ठेसाठीं सर्व धार्मिक, सामाजिक व राजकीय बंधनांचें उल्लंघन करण्यांत आणि समाजावरील व क्रांतिधर्मावरील निष्ठेसाठीं भोगावे लागणारे क्लेश सहन करण्यांत समाधान मानणारांची शांति आज हवी आहे. अशा सत्याग्रही निष्ठेनें समाजाचा हृदयपालट त्वरित करून शेतकरी-कामकरी वर्गाच्या संघशक्तीनें शेतकरी-कामकरी राज्य स्थापन करण्याचें ध्येय अमलांत आणूं इच्छिणारे सत्याग्रही आज हवे आहेत. समाजवाद हा सत्याग्रहाला मारक आहे हा भ्रम सोडून देऊन समाजवाद हाच आजचा युगधर्म आहे असें ओळखणारे सत्याग्रही जनतेचा हृदयपालट घडवून आणतील व ब्रिटिशांच्या हातची सार्वभौम सत्ता मधल्या भांडवलदारांच्या, संस्थानिकांच्या व सरंजामदारांच्या हातीं जाऊं न देतां शेतकरी-कामकरी वर्गाच्या हातीं देऊन खरी लोकशाही, खरा समाजवाद स्थापन करूं शकतील.

★

# सत्याग्रह आणि समाजवाद : :

प्रवचन १० वें

समाजवाद हा युगधर्म आहे, आणि सत्याग्रह हा मानवांचा सनातन धर्म आहे, या मताचें अधिक स्पष्टीकरण आतां करावयाचें आहे. धर्माचें एक शाश्वत अंग असतें व दुसरें अशाश्वत अथवा पालटणारें, नित्य-नूतन असें अंग असतें. मनुष्यानें आपलें आत्मस्वरूप शोधून काढावें आणि त्याची प्राप्ति करून घ्यावी हा मनुष्याचा सनातन धर्म आहे. त्यानें आपली बुद्धि सत्यनिष्ठ बनविली पाहिजे, अंतःकरण प्रेममय बनविलें पाहिजे आणि आचरण तपश्चर्येनें पवित्र करीत राहिलें पाहिजे, हाच त्याचा सनातन धर्म होय. सर्व मानवांना असें शुध्द, मुक्त स्वरूप प्राप्त व्हावें यासाठीं निर-निराळ्या समाजरचना निरनिराळ्या परिस्थितींना अनुरूप अशा घडवाव्या लागतात. या समाजघटनांचा उद्देश मानवाला हें आत्मस्वरूप प्राप्त करून घेण्यास आणि आपलें वैयक्तिक व सार्वजनिक जीवन सुखी, समृद्ध, सुसंस्कृत आणि शांतिमय बनविण्यास सहाय्य करावें हाच असला पाहिजे या समाज-घटनांच्या शास्त्रासच पूर्वी स्मृतिशास्त्र असें म्हणत असत व आत्मप्राप्तीच्या शास्त्रास श्रुति असें नांव होतें. यांनाच धर्मशास्त्र व मोक्षशास्त्र असेंहि म्हण-तात. धर्मशास्त्राचा उद्देश समाजधारणा हा असून मोक्षशास्त्राचा उद्देश आत्म-प्राप्ति हा असतो. दोन्हीहि शास्त्रांत एकसारखी भर पडत असते व तशी भर पडत राहिलीच पाहिजे. आत्मस्वरूपाचें ज्ञान व त्यासंबंधीचे सिध्दांत वाढतां वाढतां आज आपण सत्य, प्रेम व तप हेंच त्याचें सर्वश्रेष्ठ स्वरूप होय व सर्व

धर्मांचें रहस्य होय, असें जाणूं लागलों आहोंत. आज परब्रह्म, परमात्मा किंवा परमेश्वर यासंबंधींचे विशिष्ट सिध्दांत बुध्दीनें मान्य करणें याला आत्मप्राप्तीचें साधन असें कोणीहि मानीत नाहीं. यामुळेंच यासंबंधीं निरनिराळे सिध्दांत प्रतिपादन करणारे गीता, धम्मपद, बायबल, कुराण हे सर्व धर्मग्रंथ एकच संदेश देत आहेत, असें आम्ही म्हणूं शकतों. तसेंच समाजांतील सर्व व्यक्तींचें परस्परासंबंधींचें प्रेम अधिकांत अधिक वाढावें, त्यांचे सर्व व्यवहार अधिकांत अधिक सत्यनिष्ठ वा न्यायनिष्ठ बनावेत आणि त्यांच्या व्यवहारांत अधिकांत अधिक संयम व शुध्दता यांचें प्रतिबिंब पडावें, यासाठीं समाजवादी घटना अवश्य झाली आहे, हें लक्षांत घेऊनच समाजवाद हा आजचा युगधर्म किंवा समाजवाद हेंच आजचें स्मृतिशास्त्र बनलें आहे, असें आपण म्हणतों.

## समाजवादी निष्ठा व सत्याग्रही क्रांति

मोठमोठे कारखाने, जमिनी आणि पेढ्या यांच्यावर खाजगी व्यक्तींची मालकी ठेवल्यानें समाजांत गोंधळ माजत आहे म्हणून त्यांवर समाजाची मालकी स्थापन होऊन शेतकरी-कामकरी राज्य स्थापन होईल तरच समाजांत शांति, पुष्टि व तुष्टि नांदूं लागतील, हें समाजाला पटवून देणें आज अवश्य झालें आहे. ही नवी निष्ठा समाजांत निर्माण करण्याचें कार्य सत्याग्रहींनीं केलें पाहिजे. त्यासाठीं आपलें सर्वस्व अर्पण केलें पाहिजे आणि शेतकरी-कामकरी वर्गाला संघटित करून भांडवलदारी समाजघटना अनत्याचारी असहकारानें उलथून पाडण्याची शक्ति आपल्यापाशीं आहे असा आत्मविश्वास शेतकरी-कामकरी वर्गांत निर्माण केला पाहिजे. शेतकरी-कामकरी वर्गाच्या या अनत्याचारी असहकारास सार्वत्रिक संपाचें स्वरूप प्राप्त झालें असतां भांडवलदारी समाजघटना एक दिवसहि चालूं शकणार नाहीं, हें स्पष्ट आहे. शेतकरी-कामकरी वर्गानें असा सार्वत्रिक संप अनत्याचारी वृत्तीनें घडवून आणिला म्हणजे समाजांत नक्की समाजवादी निष्ठा निर्माण झाली असें प्रत्यक्ष प्रयोगानेंच सिद्ध होणार आहे. भांडवलशाही घटनेवरील समाजाची निष्ठा नष्ट झाली आणि समाजवादी नवी निष्ठा निर्माण झाली, याचा प्रत्यय शेतकरी–कामकरी वर्गाच्या सार्वत्रिक संपानें आणून दिल्यानंतर प्रस्थापित राज्ययंत्रानें या नव्या निष्ठेचें संरक्षण करण्यासाठीं आपल्या सैनिक-शक्तीचा उपयोग केला पाहिजे. राज्यकर्त्यांच्या हातीं जें सैन्यबल व संघटित शस्त्रबल समाजानें दिलें असेल,

तें बल समाजानें स्वीकारलेल्या निष्ठेचें रक्षण करण्यासाठींच उपयोगांत आणिलें पाहिजे. असें न करतां समाजाचें निष्ठांतर झालें असतां नव्या निष्ठेच्या रक्षणासाठीं सैन्यबल उपयोगांत न आणतां तें जर ती नवी निष्ठा चिरडून टाकण्यासाठीं उपयोगांत आणलें गेलें, तर असहकाराचें धोरण सैनिकांतहि प्रवेश केल्यावांचून राहणार नाहीं. सैनिक व शिपाई यांनीं या सामाजिक निष्ठांतरास मान्यता दिली म्हणजे जुन्या निष्ठेचा आग्रह धरून नवी निष्ठा चिरडूं पाहणारी अधर्मी किंवा सैतानी राज्यसंस्था मोडून व कोसळून पडण्यास वेळ लागणार नाहीं. अशा वेळीं राज्यकर्ते दूरदर्शी असले, तर क्रांतिकारक शक्तीपुढें नमतात किंवा अदूरदर्शी व दुराग्रही असले, तर तिच्या माऱ्यापुढें न वांकतां राज्ययंत्र कोसळून पडलें तरी आम्ही नमणार नाहीं, अशी आसुरी वृत्ति धारण करतात. अशा वेळीं एक राज्ययंत्र कोसळून पडून दुसरें निर्माण होईपर्यंतच्या काळांत समाजाला एका अराजक अवस्थेंतून जावें लागतें. पण समाजाचें खरें निष्ठान्तर झालें असेल, तर तो आपल्या नव्या निष्ठेस अनुसरून तिचें रक्षण करणारें नवें राज्ययंत्र निर्माण केल्यावांचून रहात नाहीं. पण जुनें राज्ययंत्र कोसळून पडण्यापूर्वीं समाजाचें खरें निष्ठांतर झालेलें असलें तरच त्याला असें नवें राज्ययंत्र निर्माण करून समाजांतील गोंधळ व अराजक बेबंदशाही नष्ट करतां येईल. नाहीं तर समाज अराजकाला कंटाळून प्रतिक्रांतिकारक पक्षाच्या अनियंत्रित सत्तेपुढेंहि मान वांकविण्याचा धोका असतो. हा धोका टाळण्यास, क्रांतिकार्यास अवश्य असणारें निष्ठांतर म्हणजे समाजाच्या अंतःकरणांत जुन्या समाजघटनेवरील निष्ठा नष्ट होऊन नव्या घटनेवर निष्ठा बसण्याचें कार्य अनत्याचारी असहकारानेंच घडून येणें अत्यंत इष्ट असतें. समाजावर ही नवी निष्ठा सक्तीनें किंवा दहशतीनें लादणें शक्यहि नसतें व इष्टहि नसतें. म्हणून हें निष्ठांतराचें कार्य अनत्याचारी असहकारानेंच घडवून आणण्याची दक्षता घेणारे सत्याग्रही जितके अधिक निघतील तितकी समाजवादी क्रांति यशस्वी होण्याच्या मार्गांतील धोका कमी होईल, हें उघड आहे.

## सत्याग्रही समाजवाद

हिंदुस्थानांत आज एक लोकशाही राज्य स्थापन होत असून ब्रिटिशांचें सार्वभौमत्व नष्ट होत आहे. पण ही लोकशाही भांडवलदार वर्गाच्या आहारीं

जाण्याचा धोका असून ब्रिटिशांचें सार्वभौमत्व आमच्या हातीं आलें पाहिजे असा गिल्ला करणारे संस्थानिक आणि मुस्लीम लीगसारखे धर्मनिष्ठ जमातवादी राजकीय पक्ष जनतेच्या जातिनिष्ठेला, धर्मनिष्ठेला व प्रांतनिष्ठेला भडकवून देशांत गोंधळ माजवूं पहात आहेत. हा जातिनिष्ठेचा, धर्मनिष्ठेचा व प्रांतनिष्ठेचा गोंधळ थांबवून जमातवादाच्या खडकावर हिंदी राष्ट्रवादाची नाव फुटण्याचा व तिचे शतशः तुकडे पडण्याचा भयंकर धोका आज निर्माण झाला आहे. या धोक्यांतून वांचावयाचें असेल, तर म. गांधींनीं पंचवीस वर्षांपूर्वीं जें अनत्याचारी असहकाराचें शस्त्र जनतेच्या हातीं दिलें आहे, त्याच शस्त्राच्या साधनानें आपणांस शेतकरी-कामकरी वर्गाचें सार्वभौम राज्य या देशांत स्थापन करतां येईल, हा आत्मविश्वास शेतकरी-कामकरी वर्गांत आज निर्माण करणें अगत्याचें झालें आहे. हिंदी समाजवादी पक्ष आज हें कार्य आपल्यापरी करीत असून त्याच्या त्या कार्यामागें आपलें आत्मबल उभें करून तें कार्य सफल होईल अशी खटपट करणें हें खऱ्या सत्याग्रही समाजवाद्यांचें कर्तव्य आहे. असें ते करतील, तर भारतांत स्थापन होणारा समाजवाद हा खरी लोकशाही स्थापन करूं शकेल, अशी माझी निष्ठा आहे. यावेळीं देशांत शेतकरी-कामकरी वर्गाच्या जातिभेदातीत व धर्मभेदातीत वर्गसंघटनेला आद्य स्थान देणें अवश्य झालें आहे. तसें न करतां जर घटनापरिषदेंतून निर्माण होणारी सदोष भांडवलदार लोकशाहीच दृढमूल करण्याचा प्रयत्न ते करतील, तर त्यांचें तें धोरण सत्याग्रही तत्त्वास भ्रष्ट करणारें बनेल; इतकेंच नव्हे, तर त्या धोरणांतून भांडवलदारी एकपक्षसत्ता निर्माण होण्याचाहि धोका उत्पन्न होईल. म्हणून सत्याग्रहींपैकीं ज्यांना समाजवाद हाच आजचा युगधर्म आहे हें पटलें असेल, त्यांनीं घटनापरिषदेंतून निर्माण होणाऱ्या भांडवलदार लोकशाहीचें त्वरित रूपांतर समाजवादी लोकशाहींत करतां यावें म्हणून आतांपासून जनतेंत समाजवादी निष्ठा निर्माण करण्याचें आणि त्या निष्ठेसाठीं संघटित असहकारानें समाजवादी क्रांति घडवून आणणाऱ्या पक्षाला आपलें अनत्याचाराचें तत्त्व उपयुक्ततावादी दृष्टीनें पटवून देण्याचें व आपल्या जीवनांत सत्याग्रही जीवननिष्ठा जिवंत ठेवण्याचें कसून प्रयत्न केले पाहिजेत. असें करावयाचें तर नवें राज्ययंत्र समाजवादी पक्षाच्या हातीं जाईल आणि त्याच्याविरुद्ध भांडवलदार वर्गानें किंवा सरंजामदार वर्गानें बंड उभारल्यास धर्माच्या भुलीला वश होऊन जनता त्यांच्या बाजूस

जाणार नाहीं अशी दक्षता घेत राहिलें पाहिजे. जर भांडवलदार-सरंजामदारां नीं देशांतील नवें राज्ययंत्र बळकावलें तर क्रांति करून तें शेतकरी-कामकरी वर्गाच्या हातीं देण्यासाठींहि त्यांनीं आपल्या आत्मशक्तींचा व्यय केला पाहिजे व प्रसंग पडल्यास त्या कार्यासाठीं आपल्या प्राणांचीहि आहुति देण्यास तयार राहिलें पाहिजे. गेल्या पंचवीस वर्षांत जी सत्याग्रहशक्ति भारतात निर्माण झाली आहे, तिचा योग्य विकास याच दिशेनें व मार्गानें होऊं शकेल. या सत्याग्रही शक्तीनें आजपर्यंत राष्ट्रवादाशीं साथ दिली, आतां यापुढें समाजवादाशीं साथ करण्याचें धोरण तिनें स्वीकारलें पाहिजे. असें होईल तर राष्ट्रसभा चिरंजीव होईल. नाहीं तर ती भ्रष्ट होईल व ती तशी भ्रष्ट होण्यापेक्षां नष्ट झाली तरीहि वाईट नाहीं. कारण भ्रष्ट होण्याऐवजीं नष्ट होणें हेंच आत्मरक्षण होय. हें तत्त्वनिष्ठेचें आत्मरक्षण विसरून तिच्या केवळ देहरक्षणाचा मोह धरणें हें तिचा आत्मघात करण्यास प्रवृत्त होण्यासारखेंच नाहीं काय? आत्मरक्षणासाठीं देहपात झाला तरी राष्ट्रसभेचा आत्मा यापुढें समाजवादी देह धारण करून आपला प्रभाव सर्व जगाला दाखवील आणि या देशांत भांडवलदार व सरंजामदार यांनीं बंड माजविलें, तरी त्याचें शमन करून खरी समाजवादी लोकशाही स्थापन करूं शकेल, याबद्दल मला शंका वाटत नाहीं. म्हणून आज देशांतील जितके तरुण समाजवादी बनतील तितके मला हवे आहेत. सत्याग्रहाला त्यांनीं कांहीं काळ झिडकारलें तरीहि त्याची खरी महती तेच ओळखतील व त्यांच्यांतूनच सत्याग्रही समाजवादी निष्ठावंत निर्माण होतील अशी मला दृढ आशा वाटते. याच्या उलट, जे सत्याग्रहाच्या नांवानें समाजवादाला विरोध करीत आहेत, ते समाजवादाप्रमाणें सत्याग्रहालाहि धोका निर्माण करीत आहेत असें मी मानतों. यामुळें मला पहिले अधिक प्रिय वाटतात, व दुसरे तितके प्रिय वाटत नाहींत.

★

# सत्याग्रही समाजवाद : :

प्रवचन ११ वें

ता. २० जुलै १९४७ च्या 'हरिजन'मध्यें महात्मा गांधींनीं समाजवादासंबंधीं एक अत्यंत विचारप्रवर्तक असा लेख लिहिलेला आहे. ज्यांना सत्य आणि अहिंसा यांची खरी उपासना करावयाची असेल त्यांनीं समाजवादी बनलें पाहिजे, आणि ज्यांना खरा समाजवाद हवा असेल त्यांनीं सत्याग्रही बनलें पाहिजे, असें त्यांतील मुख्य सूत्र आहे. सत्याग्रह म्हणजे ज्ञान आणि प्रेम किंवा सत्यनिष्ठा आणि अहिंसावृत्ति यासंबंधींचा आग्रह. मनुष्य आणि पशु यांच्यांतील भेद ज्ञान आणि प्रेम या दोन शब्दांनींच व्यक्त करतां येईल. केवळ ज्ञान अधिक वाढल्यानें माणुसकी वाढली असें होत नाहीं; तसेंच केवळ प्रेम असल्यानेंहि मनुष्यत्वाची परिणति होत नाहीं. सर्व विश्वाचें ज्ञान करून घ्यावें आणि सर्व विश्वावर प्रेम करावें, अशी जी मानवी अंतःकरणांतील प्रचंड प्रेरणा, तिलाच महात्मा गांधींच्यासारखे संत ईश्वर किंवा परमेश्वर असें नांव देत असतात. ही प्रेरणा प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत आहे आणि ती प्रेरणा प्रज्वलित करून तिच्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम करण्यास तयार होणें हीच सत्याग्रही निष्ठा होय. ही प्रेरणा आपल्या शरीरांत आहे. पण आपलें शरीर म्हणजे ती प्रेरणा नव्हे, असें महात्मा गांधी म्हणतात. कारण मानवी अंतःकरणांतील ही प्रचंड प्रेरणा किंवा शक्ति जागृत झाली असतां मनुष्य आपल्या देहाचें समर्पण करण्यासहि तयार होतो. अर्थातच ही शक्ति आपल्या शरीराहून श्रेष्ठ आहे हें सिद्ध होतें. पण आपलें शरीर हें त्या

शक्तीचें एक साधन आहे. जोंपर्यंत ज्ञानाचा आणि प्रेमाचा प्रसार करण्याच्या कामीं आपल्या शरीराचा उपयोग होत असतो, तोंपर्यंतच त्या शरीराचें महत्त्व सत्याग्रही मनुष्यास वाटत असतें. पण ज्यावेळीं तें शरीर आपल्या ज्ञानाच्या व प्रेमाच्या विकासाच्या आड येऊं लागतें, तेव्हां त्या शरीराचा त्याग करूनहि आपली सत्यनिष्ठा कायम ठेवणें हेंच आपलें जीवनांतील रहस्य होय, असें सत्याग्रही मनुष्यास वाटूं लागलें पाहिजे. अर्थातच अशा वेळीं आपण सत्यनिष्ठ रहावें कीं देहनिष्ठ रहावें, म्हणजे सत्याचा सांभाळ करावा कीं देहाचा सांभाळ करावा, असा पेंच सत्याग्रही मनुष्यापुढें उभा रहातो. तेव्हां त्याला आपला देह हें बंधन वाटूं लागतें आणि त्या बंधनाचा त्याग करण्यास तो आनंदानें तयार होतो. आजच्या समाजांत ज्यांना सत्यनिष्ठेनें आणि प्रेमानें वागावयाचें असेल त्यांनीं समाजवादी बनलेंच पाहिजे, असें महात्मा गांधींनीं जितक्या निर्धारानें सांगितलें आहे, तितक्याच निर्धारानें ते असेंहि म्हणतात, कीं ज्यांना खरा समाजवाद हवा असेल त्यांनीं सत्याग्रही बनलें पाहिजे. सत्याग्रह हें एकच साधन असें आहे, कीं ज्याच्या योगानें समाजांतील सर्व अन्यायांचें निवारण लोकांना करतां येईल; मग ते अन्याय राजकीय असोत, आर्थिक असोत, किंवा नैतिक असोत.

महात्मा गांधी यांनीं सत्यनिष्ठा, प्रेमभावना आणि ईश्वरनिष्ठा या सर्वांचें जें एक समीकरण प्रस्तुत लेखांत मांडिलेलें आहे, तें समीकरण जर आपण समजून घेतलें नाहीं, तर गांधीजींच्या या लेखाचा बरोबर उलगडा आपल्या बुद्धीस होऊं शकणार नाहीं गांधीजींची ईश्वरनिष्ठा ही सत्यनिष्ठेहून किंवा न्यायनिष्ठेहून भिन्न वस्तु नाहीं. स्वहितबुद्धि आणि सर्वहितबुद्धि अशा दोन वृत्ती प्रत्येकाच्या अन्तःकरणांत असतात. यापैकीं जी सर्वहितबुद्धि तिलाच ईश्वरनिष्ठा असें म्हणतां येतें. महात्मा गांधी जेव्हां प्रत्येकानें ईश्वरनिष्ठ झालें पाहिजे असें म्हणतात, तेव्हां प्रत्येकानें स्वतःचें हित करण्याची वृत्ति न धरतां सर्वांचें हित होईल अशा बुद्धीनें वागत राहिलें पाहिजे व त्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा त्याग केला पाहिजे, एवढेंच ते प्रतिपादीत असतात. अर्थातच ही सर्वहितबुद्धि जर जागृत असेल, तर त्या त्या काळीं जी समाजघटना सर्वांना हितप्रद होईल ती समाज-घटना यावी असें मनुष्याला वाटूं लागेल. आज समाजवाद स्थापन झाल्याखेरीज सर्वांचें हित होऊं शकणार नाहीं, हें महात्मा गांधींना पटल्यामुळेंच ते म्हणूं लागले आहेत कीं; 'सत्याचें आणि अहिंसेचें मूर्त स्वरूप समाजवाद हेंच असलें पाहिजे.'

अर्थात् हा समाजवाद सर्वांना न्याय देणारा असला पाहिजे हें जितकें खरें आहे, तितकें हेंहि खरें आहे कीं, त्या समाजवादी घटनेवाली सर्वांनीं एकमेकांवर प्रेम करीत राहिलें पाहिजे. हा न्यायनिष्ठेचा व प्रेमाचा संदेश देणारा समाजवाद सत्याग्रहाच्या साधनानेंच निर्माण करितां येईल, हें महात्मा गांधींचें मतहि सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास सर्वांना मान्य करावें लागेल. आपल्यावरील प्रत्येक अन्यायाशीं असहकार करावयाची ही वृत्ति सर्व जनतेला पटली आणि ती त्या वृत्तीनें संघटित होऊन भांडवलशाहीशीं असहकार करूं लागली, तर तिला समाजवादाची स्थापना करण्यास कोणत्याहि अत्याचाराची आवश्यकता उरणार नाहीं हें उघड आहे. समाजांतील सर्व शेतकरी व कामकरी संघटित होऊन एकमुखानें असें जाहीर करतील कीं, आम्ही यापुढें कोणाचेहि नोकर नसून आम्हीच देशांतील सर्व संपत्तीचे मालक आहोंत; आणि या जाहीर घोषणेप्रमाणें ते भांडवलशाही समाज आपल्या अनत्याचारी असहकारानें बंद पाडतील. कोणाचीहि हिंसा किंवा द्वेष न करतां त्यांना शेतकरी–कामकऱ्यांचें राज्य आपल्या देशांत स्थापन करितां येईल, याबद्दल कोणाचाहि मतभेद होण्याची गरज नाहीं. ही प्रचंड आत्मनिष्ठा व हा आत्मविश्वास शेतकरी–कामकरी वर्गांत निर्माण करणें हेंच प्रत्येक सत्याग्रही व्यक्तीचें यापुढील कार्य आहे असें महात्मा गांधी आपल्या या लेखानें जाहीर करीत आहेत. हिंदुस्थानांतील सर्व सत्याग्रहींनीं या आदेशाप्रमाणें समाजवादाची उपासना करण्याचें ठरविल्यास, या देशांत कोणताहि अत्याचार न करतां सत्याग्रही समाजवादाची स्थापना करतां येईल; आणि अशा रीतीनें प्रस्थापित झालेला समाजवाद सर्व जगाला सत्यनिष्ठेचा व प्रेमाचा संदेश देत राहील. महात्मा गांधींचे सर्व शिष्य या रीतीनें समाजवादाच्या प्रस्थापनेसाठीं आपणांस वाहून घेतील, तर हिंदुस्थानांत तरी केवळ अनत्याचारी क्रांतीनें समाजवादाची संस्थापना होऊं शकेल, हें मत आम्हीं आजपर्यंत अनेकवार मराठी वाचकांपुढें मांडिलेलें आहेच. आतां देशांत लोकशाही राष्ट्रीय राज्य स्थापन झालेलें आहे. अशा वेळीं देशांत अत्याचारी वातावरण फैलावलें गेल्यास त्याचा फायदा समाजवाद्यांना न मिळतां निजामासारखे अनियंत्रित राजे प्रबळ बनून सरंजामशाही व भांडवलशाही यांचें राज्य स्थापन होईल, ही भीति भाई जयप्रकाश यांनींहि प्रकट केली असून तेहि समाजवाद्यांना शांततेचा व अनत्याचाराचा उपदेश करीत आहेत. राष्ट्रीय सभेनें देशांत अनत्याचारी क्रांति करून शेतकरी-कामकऱ्यांचें

राज्य स्थापन करण्याची प्रतिज्ञा केलेली आहे. या प्रतिज्ञेचें तिला पालन करावयाचें असेल, तर तिनें यापुढें समाजवादाचा उघड अंगीकार व पुरस्कार केला पाहिजे, हेंच तत्त्व महात्मा गांधी व भाई जयप्रकाश हे दोघे आपापल्या वृत्तीनुसार जनतेला सांगत आहेत. राष्ट्रीय सभा व तिचे अनुयायी योग्य तो बोध घेतील अशी आम्हांस आशा आहे. यापुढें समाजवादाच्या प्रस्थापनेचें ध्येय जर राष्ट्रसभेनें अंगीकारिलें नाहीं, तर देशांत शांततारक्षण करून समाजाची योग्य धारणा करण्याचें कर्तव्य तिला पार पाडतां येणार नाहीं.

★

# हिंदी स्वातंत्र्याचा जयजयकार !

प्रवचन १२ वें

ता. १५ ऑगस्ट १९४७ हा दिवस हिंदुस्थानच्या इतिहासांत मोठा क्रांतिकारक समजला जाईल. सुमारें साडेतीनशें वर्षांपूर्वी इ. स. १६०० सालीं ब्रिटनमध्यें ईस्ट इंडिया कंपनी नांवाची व्यापारी कंपनी स्थापन झाली. या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत अकबर बादशहाचें मोंगल साम्राज्य होतें. दक्षिणेंत बहामनी राज्याचे पांच तुकडे आणि मोडकळीस आलेलें विजयनगरचें हिंदु साम्राज्य अशीं राज्यें होतीं. मालोजीराजे अहमदनगरचे सरदार असून शहाजी व जिजाबाई यांचा बालविवाह नुकताच साजरा झाला होता. १६३० सालीं शिवाजी महाराजांचा जन्म झाला, त्यावेळीं ईस्ट इंडिया कंपनीनें मोंगल बादशहा जहांगीर याच्याकडून नुकतीच व्यापाराची परवानगी मिळविली होती. शहाजहान बादशहाच्या वेळीं दक्षिणेंतील अहमदनगरचें राज्य मोंगलाईत सामील झालें आणि या धालमेलींत शहाजीराजे यांनीं अहमदनगर, विजापूर व मोंगल याच्या भांडणाचा फायदा घेऊन स्वतंत्र मराठी राज्याचा प्रयत्न करून पाहिला; पण तो फसणार असें पाहून कर्नाटकांत मांडलिकी राज्य स्थापन केलें आणि आपल्या मुलाच्या करवीं पुणें जहागिरींत "हिंदवी स्वराज्य" नांवाचें स्वतंत्र राज्य निर्माण करण्यास प्रोत्साहन दिलें. शिवाजी महाराजांनीं औरंगजेबाच्या कारकीर्दींत स्वतःला अभिषेक करवून घेऊन भावी मराठी साम्राज्याचा पाया इ. स. १६७४ सालीं घातला. या मराठी साम्राज्याची वाढ होतां होतां १७५०च्या सुमारास दिल्लीच्या बादशहाचीं सूत्रें मराठयांच्या हातीं आलीं. मोंगल बादशाही मोडून

सर्व हिंदुस्थानांत मराठयांचें साम्राज्य होणार अशी आशा मराठे लोकांना वाटूं लागली. दिल्लीच्या बादशहाचे वजीरं आणि वकील-इ-मुतालक पुण्याचे पेशवे बनले आणि १७९० पर्यंत महादजी शिंदे आणि नाना फडणीस यानीं म्हैसूर-कर्नाटकपासून लाहोर-पेशावरपर्यंत आपला दरारा बसविला. पण यापुढील पंचवीस वर्षांतच मराठी साम्राज्याचा डोलारा एकदम गडगडला आणि १८१८ मध्यें दिल्लींतील लाल किल्ला आणि पुण्यांतील शनवारवाडा यांच्यावर ब्रिटिशांचें युनियन जॅक फडकूं लागलें ! शें-दीडशें वर्षांच्या प्रयत्नांनीं स्थापन झालेलें मराठयांचें साम्राज्य पन्नास-पाऊणशें वर्षांत ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें धुळीस मिळविलें. यानंतर साठ वर्षांनीं १८८५ सालीं हिंदी राष्ट्रसभा स्थापन झाली आणि साठ-बासष्ठ वर्षें प्रयत्न करून तिनें दिल्लीच्या लाल किल्ल्यावर सव्वाशें वर्षें फडकत असणारें युनियन जॅक खालीं ओढून त्या ठिकाणीं आपला तिरंगी झेंडा उभा केला. आणि तोच तिरंगी झेंडा आज पुण्याच्या शनवारवाड्यावरहि फडकूं लागला आहे, याबद्दल कोणा हिंदवासियाच्या अंतःकरणांत आनंदाचें व अभिमानाच भरतें येणार नाहीं ? ही राज्यक्रांति हिंदी जनतेनें आपल्या नैतिक बळानें निःशस्त्र असतांना घडवून आणिली असून लोकशाही आणि स्वयंनिर्णय, सत्याग्रह आणि समाजवाद अशीं उदात्त ध्येयें या क्रांतीच्या बुडाशीं आहेत.

## भांडवलदार संस्कृतीचा उदय आणि अस्त

ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनी स्थापन होऊन ती हिंदुस्थानशीं व्यापार करूं लागली, त्यावेळीं जगांत सरंजामशाही युगाचा अंत होऊन भांडवलदार संस्कृतीचा उदय होत होता. क्षात्रयुग संपून वैश्ययुग निर्माण होत होतें. या युगांत जी व्यापारी संस्कृति निर्माण झाली, तिची भरभराट प्रथम ब्रिटनमध्यें-च झाली आणि ति या भरभराटीच्या तीनशें वर्षांच्या काळांत म्हणजे इ. स. १६०० ते १९०० पर्यंतच्या तीन शतकांत ब्रिटनची एकसारखी भरभराटच होत गेली. ब्रिटिश भांडवलशाही व ब्रिटिश साम्राज्यशाही यांना युरोपांत फ्रेंचांचा आणि हिंदुस्थानांत मराठयांचा पाडाव झाल्यापासून शंभर वर्षेंपर्यंत कोणीहि प्रतिस्पर्धी नव्हता. ब्रिटिश संस्कृति सर्व जगांत प्रभावी बनली होती. पण १९१४ सालीं जर्मन महायुद्ध सुरू झालें तेव्हां ब्रिटिश साम्राज्याला पहिला जोराचा धक्का बसला आणि १९१७ सालीं रशियांत समाजवादी

क्रांति झाली तेव्हां ब्रिटिश संस्कृति ही जगाच्या प्रगतीस अडथळा करणारी जीर्ण संस्कृति बनली आहे, असें जगाच्या निदर्शनास आलें. आतां व्यापारी, कारखानदाराचें वैश्ययुग संपलें आणि शेतकरीवर्गाचें समाजवादी युग सुरू झालें अशी घोषणा रशियांतील क्रांतींतून जगभर घुमूं लागली. पहिल्या अँग्लो-जर्मन युद्धांत ब्रिटिश, फ्रेंच व अमेरिकन राष्ट्रांचा विजय झाला आणि त्यांनीं सर्व जगांत स्वातंत्र्याची, स्वयंनिर्णयाची आणि लोकशाहीची स्थापना करणार अशी घोषणा केली, तरी ही गोष्ट त्यांच्या हातून घडली नाहीं. जर्मनी, ऑस्ट्रिया व टर्की यांचीं साम्राज्यें जिंकून ब्रिटिशांनीं व फ्रेंचांनीं आपलीं साम्राज्यें वाढविलीं. पण आशियांतील राष्ट्रांना स्वातंत्र्य, स्वयंनिर्णय व लोकशाही यांचा लाभ त्यांनीं होऊं दिला नाहीं. अर्थात् ब्रिटिशांची लोकशाही ही मांडवलदार लोकशाही, आणि त्यांची राष्ट्रभक्ति ही साम्राज्यभक्ति आहे असें जग म्हणूं लागलें. या वेळेपासून साम्राज्यशाही व भांडवलशाही यांच्याविरुद्ध सर्व जगांतील जनता असंतुष्ट झाली आणि शेतकरी-कामकरी-क्रांतीची घोषणा सर्वत्र होऊं लागली. या क्रांतीचा पहिला स्फोट रशियांत १९१७ सालीं झाला.

## हिंदी स्वातंत्र्याचा सत्याग्रह-संग्राम

१९१७ सालींच ब्रिटिश साम्राज्याच्या सत्तेविरुद्ध हिंदुस्थानांतील चंपारण्य जिल्ह्यांतील शेतकरी-मजुरांनीं पहिला सत्याग्रह-प्रयोग म. गांधींच्या नेतृत्वाखालीं केला. या वेळपासून हिंदी राजकारणांत एक नवी शक्ति निर्माण झाली व जगांतील शेतकरी--कामकरी वर्गाच्या हातीं एक नवें शस्त्र उपलब्ध झालें. हिंदुस्थानांतील जनता ब्रिटिशांनीं निःशस्त्र बनविली होती. ब्रिटिश साम्राज्य या देशांत येण्यापूर्वी येथील जनतेच्या हातीं शस्त्रें होतीं तरीहि या देशांत लोकशाही राज्य नव्हतें. धार्मिक जुलूम, सामाजिक विषमता आणि राजकीय अन्याय यांनीं येथील जनता हैराण झाली होती. कोणीहि हजार-दोन हजार शिलेदार जमवावेत, पांच-पन्नास गांवें लुटावीत आणि सरंजामदार, सरदार, जहागिरदार बनावें असा काळ निर्माण झाला होता. मोंगलांचें साम्राज्य मोडल्यानंतर सर्व देशभर सरंजामदार व सरदार-जहागिरदार यांचा हैदोस चालू होता. मराठे, रजपूत, जाठ, रोहिले, शीख असे अनेक सरदार दिल्लीचें

तख्त काबीज करण्यासाठीं लढत होते. या सर्वांचा पाडाव करून पेशवे, शिंदे, होळकर व नागपूरचे भोसले हे एक ध्येयानें, एक विचारानें व एक मनानें वागते, तर आपलें सार्वभौमत्व ते स्थापूं शकले असते. पण त्या सर्वांना एका विचारानें व एका शिस्तीनें वागावयास लावील अशी शक्ति अथवा अशी व्यक्ति या देशांत नव्हती. सर्व हिंदुस्थानांत केवळ हिंदुपदपातशाही स्थापन होणें त्यावेळींहि शक्य नव्हतें. महादजी शिंदे व नाना फडणीस यांनाहि उघडपणें दिल्लीच्या सिंहासनावर हिंदू राजाची स्थापना करणें व्यवहार्य वाटत नव्हतें. आणि त्याहूनहि श्रेष्ठ अशा लोकशाही ध्येयाची कल्पनाहि त्यांना आलेली नव्हती. हिंदुस्थानांत हिंदुपदपातशाही स्थापन व्हावी कीं मोंगल बादशहाचें साम्राज्य असावें, या वादांतच ते कुचमत राहिले होते. ब्रिटिश व्यापारी संस्कृति यावेळीं त्यांच्यापुढें गेलेली होती. सर्व देशभर शांततेचें व सुव्यवस्थेचें कायद्याचें राज्य स्थापन करून ईस्ट इंडिया कंपनीनें पन्नास-पाऊणशें वर्षें येथील सामान्य जनतेचें चित्त आकर्षून घेतलें. कायद्याचें राज्य मोहक होतें, पण त्यांत कायदेशीर चोरीचे व्यवहार सुरू होते. पन्नास-पाऊणशें वर्षांत हा कायदेशीर अंमल जनतेला भीषण वाटूं लागला. खेड्यापाड्यांतील सर्व उद्योगधंदे ठार झाले; शेतकऱ्याला जोडधंदा उरला नाहीं; सावकार, व्यापारी, वकील व अधिकाऱ्यांच्या कायदेशीर व्यवहारांनींच शेतकरी हैराण झाला आणि शेतकऱ्याला प्राणाहूनहि प्रिय असणारी जमीन सावकाराकडे जाऊं लागली. धान्य विकतांना आणि माल खरेदी करतांना व्यापारी लुबाडूं लागला आणि ही लुबाडणूक कायदेशीर असल्यानें तिचा प्रतिकार करणें अशक्य झालें. यामुळें जनतेच्या वतीनें कायदेशीर मार्गानें भांडणारी राष्ट्रसभा अस्तित्वांत आली. पण कायदेच जेथें अन्यायाचे असतील तेथें कायदेशीर मार्गानें भांडून जनतेचा उद्धार कसा होणार? म्हणून राष्ट्रसभेनें आतां अन्यायी कायदे मोडण्याचें धोरण स्वीकारलें, तरच तिला जनतेचा उद्धार करतां येईल असें म. गांधींनीं राष्ट्रसभेला सुचविलें. अन्यायी कायद्यांचा भंग करावयाचा पण अत्याचार करावयाचा नाहीं, या व्रतालाच म. गांधी सत्याग्रह असें म्हणतात. हिंदी जनता अज्ञानांत दारिद्र्यांत व जुलमांत रुतलेली असली, ती निःशस्त्र असली, तिच्यावर परकीयांचें सार्वभौमत्व नांदत असलें, तरीहि तिनें या सत्याग्रह-शस्त्राचा अवलंब केला तर या देशांत

एक क्रांति घडून येईल व या क्रांतींतून शेतकरी-कामकरी जनतेचें राज्य स्थापन होईल अशी आशा म. गांधींनीं राष्ट्रसभेच्यामार्फत सर्व हिंदी जनतेंत निर्माण केली. राष्ट्रसभा सत्याग्रही बनल्यापासून तिचा प्रभाव ब्रिटिश सत्तेवर पडूं लागला. १९२० सालापासून राष्ट्रसभेचें तेज सर्व खेड्यापाड्यांत फैलावूं लागलें आणि राष्ट्रसभेनें आदेश दिल्याबरोबर तिच्या तिरंगी झेंड्याखालीं कोट्यवधि जनता जमूं लागली. लक्षावधि सत्याग्रही ब्रिटिशांचे कायदे मोडून आनंदानें तुरुंगात जाऊं लागले. अशा प्रकारें ब्रिटिशांनीं या देशांत स्थापन केलेल्या कायद्याच्या राज्याचा अंत राष्ट्रसभेनें १९३० सालींच केला. ब्रिटिशांचें कायद्याचें राज्य केवढेंहि विस्तृत असलें अथवा प्रबल असलें, तरी तें जनतेच्या सत्याग्रही शक्तीपुढें टिकाव धरूं शकत नाहीं हें पाहून ब्रिटिशांनीं १९३५ सालीं प्रांतिक स्वराज्य देण्याचें मान्य केलें; पण हिंदुस्थान-सरकारांतील अंतिम सत्ता आपल्याच हातीं ठेवण्याचा व्यूह रचिला.

## हिंदुस्थान-सरकार काबीज करण्याचा लढा

१९३५ च्या कायद्यानें प्रांतिक राज्यें जनतेच्या हातीं आलीं, पण हिंदुस्थान-सरकार अद्यापि जनतेच्या हातीं यावयाचें होतें. १९३७ पासून १९३९ पर्यंत राष्ट्रसभेनें प्रांतिक राज्यें काबीज करून जनतेच्या वतीनें राज्य कसें चालवावें तें दाखवून दिलें. पण ब्रिटिशांनीं १९३९ सालीं या जनतेच्या मंत्र्यांना न विचारतांच राष्ट्राला दुसऱ्या महायुद्धांत लोटलें. तेव्हां म. गांधींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेनें पुन्हां असहकार व सत्याग्रह यांचा लढा सुरू केला. तो प्रभावी होऊन १९४२ सालीं ब्रिटिशांनीं ' हिंदुस्थानचा संपूर्ण स्वातंत्र्याचा व स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करतों, पण यावेळीं महायुद्धास मदत करा' अशी शिष्टाई करण्यासाठीं क्रिप्स यांना पाठविलें. पण राष्ट्रसभा केवळ भावी आश्वासनावर विसंबून युद्धसहकार्य करण्यास तयार नव्हती. आम्हांला पुढचे वायदे नकोत, तावडतोब हिंदुस्थान-सरकारांत जनतेचें मंत्रिमंडळ स्थापन करा असा न्याय्य आग्रह राष्ट्रसभेनें धरला. क्रिप्स-शिष्टाई फोल ठरली आणि १९४२ च्या ऑगस्ट महिन्यांत ब्रिटिशांविरुद्ध उघड बंड पुकारा असा क्रांतिकारक संदेश म.गांधी व राष्ट्रसभा यांनीं दिला. राष्ट्रसभेचे नेते सरकारनें तुरुंगांत टाकिले, राष्ट्रसभा बेकायदा ठरविली आणि जनतेला दहशत दाखविली. राक्षसी दडपशाही करून म. गांधी व राष्ट्रसभा

यांना नामशेष करण्याचा प्रयत्न लॉर्ड लिन्‌लिथ्‌गो यांच्या अमदानींत ब्रिटिशांनीं केला. तरीहि राष्ट्रसभा ब्रिटिशांपुढें नमली नाहीं. खेड्यापाड्यांतून तिचा झेंडा फडकत राहिला आणि तिच्या प्रेरणेनें खेडयापाडयांतून नवीं गांवराज्यें निर्माण होऊं लागलीं. हें पाहून १९४५ सालीं लॉर्ड वेव्हेल यांनीं राष्ट्रसभेचे नेते बंधमुक्त केले आणि पुन्हां दुसरी शिष्टाई सुरू केली. १९४५ ची शिष्टाई पुन्हां मोडली तरी १९४६ सालीं तिसरी शिष्टाई करणें ब्रिटिशांना भाग पडलें. अशा प्रकारें १९४६ सालीं राष्ट्रसभेचे अध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू हिंदुस्थान-सरकारचे पंतप्रधान बनले. अशा रीतीनें १९३९ सालीं प्रांतिक स्वराज्य मोडून टाकून हिंदुस्थान-सरकारच्या प्राप्तीसाठीं लढा करणारी राष्ट्रसभा सात वर्षांनंतर हिंदुस्थान-सरकारच्या सिंहासनावर आरूढ झाली.

## क्रांतिकारक राष्ट्रसभा सत्ताधारी बनली

राष्ट्रसभेनें १९१७ मध्यें म. गांधींच्या प्रेरणेनें सत्याग्रहाची दीक्षा घेतली. त्यानंतर वीस वर्षांनीं १९३७ सालीं तिनें प्रांतिक राज्यें काबीज केलीं आणि त्यानंतर दहा वर्षांनीं १९४७ सालीं दिल्लीचें सिंहासन हस्तगत केलें आणि सर्व हिंदुस्थानांतून ब्रिटिशांचें साम्राज्य नष्ट केलें. राष्ट्रसभेनें गेल्या तीस वर्षांत हा जो चमत्कार करून दाखविला, त्यास सर्व जगाच्या इतिहासांत दुसरी तोड नाहीं. हिंदुस्थानाएवढें प्रचंड राष्ट्र सर्व जगांत एकट्या चीनवांचून दुसरें कोणतेंहि नाहीं. चीनचेंहि आज दोन खंड पडलेले आहेत. हिंदुस्थानहि आज द्विखंड झालेला असला, तरीहि हे खंड लोकशाहीच्या व स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर पडलेले आहेत. चीनची स्थिति तशी नाहीं. शिवाय, हिंदुस्थानांत हिंदी संघराज्य व पाकिस्तान अशीं जीं दोन राज्यें निर्माण होत आहेत त्यांपैकीं हिंदी संघराज्य हें चीनच्या कोणत्याहि एका राज्यापेक्षां मोठें आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील दोनहि विभागांत लोकशाहीचें तत्त्व अमलांत येणार असल्यानें या दोन राज्यांचें एक राज्य बनण्यासहि फार काळ लागण्याचें कारण नाहीं. दोनहि राज्यांतील जनतेंत ही ऐक्याची भावना निर्माण करण्यानें आजचा द्विखंड हिंदुस्थान पुन्हां अखंड बनण्याचा मार्ग आपणांस सांपडणार आहे.

## सत्याग्रह आणि समाजवाद

सत्याग्रह आणि समाजवाद या दोन तत्त्वज्ञानांचा प्रसार येथून पुढें

दोन्ही राज्यांत आपणांस केला पाहिजे. हिंदी संघराज्यांत समाजवादाची स्थापना करण्याची घोषणा हिंदी राष्ट्रसभेनें केलीच असून समाजवादी राज्यघटना व समाजघटना निर्माण करण्याचेंच कार्य आतां हिंदी संघराज्यांतील लोकनायकांपुढें आहे. हें कार्य राष्ट्रसभेनेंच करावें असें आमचें मत असून तें करावयाचें तर तिचें नेतृत्व समाजवादी पुढाऱ्यांकडेच आतां देण्यांत आलें पाहिजे. ज्यांना शुद्ध सत्याग्रहाची उपसना करावयाची असेल, त्यांनीं लोकसेवेचें व्रत घेऊन सत्ता व संपत्ति यांचा पूर्ण संन्यास घेऊन शेतकरी-कामकरी जनतेला संघटित करण्याचें व सत्याग्रही बनविण्याचें व्रत अंगीकारिलें पाहिजे. पं. जवाहरलाल नेहरू, भाई जयप्रकाश, राममनोहर लोहिया, अच्युत पटवर्धन हे सर्वच पुढारी समाजवादी असून विशिष्ट परिस्थितीमुळेंच पं. नेहरूंचा इतर समाजवादी पुढाऱ्यांशीं आज थोडा मतभेद झालेला आहे. हा मतभेद मिटवून राष्ट्रसभेंतील सर्व अधिकारपदें समाजवादी धोरणाच्या व ध्येयाच्या पोटपक्षाकडे जातील अशी खटपट सत्याग्रही वृत्तीच्या सर्व लोकांनीं केली पाहिजे. केवळ चरखा, बैलाचे घाणे आणि लाकडी नांगर यांनीं आजच्या जगांत संपन्न, सुसंस्कृत आणि निरोगी ग्रामराज्यें स्थापन करतां येणार नाहींत. भौतिक विद्या आणि यंत्रकला यांचा भरपूर उपयोग करून घेतला पाहिजे. विजेची शक्ति प्रत्येक खेड्यापर्यंत पोंचविली पाहिजे. या शक्तीच्या जोरावर चालणारे लहानलहान कारखाने प्रत्येक खेड्यांत स्थापन झाले पाहिजेत. पण त्या कारखान्यांची मालकी कोणाहि एका किंवा अनेक भांडवलदारांची असतां कामा नये. सर्व गांवची मालकी या गांवांतील कारखान्यांवर व गांवच्या सर्व जमिनीवर झाली पाहिजे. जमीनदार, कारखानदार, सावकार आणि दुकानदार हे वर्ग आम्हांस मुळींच नको आहेत. गांवची दुकानदारी, गांवची कारखानदारी, गांवची सावकारी आणि गांवची जमीनदारी गांवराज्याकडे आली पाहिजे. शेतांत किंवा कारखान्यांत काम केल्यावांचून कोणाहि सुदृढ व प्रौढ व्यक्तीला पैसा मिळविण्याचा एकहि मार्ग उरतां कामा नये. गांवचा जो माल बाहेर नेऊन विकावयाचा असेल व बाहेरचा जो माल गांवांत आणून विकावयाचा असेल, त्याचा सर्व व्यवहार आणि ने-आण सरकारी नोकरांमार्फत झाली पाहिजे. गांवांतील दुकानें सहकारी पद्धतीनें चालूं शकतील. बाहेर जाणारा व आंत येणारा माल वाहून नेण्या-

आणण्याचें काम सहकारी संस्था करूं शकणार नाहींत. हें काम प्रांतिक सरकारच्या मोटारींतून होऊं शकेल. म्हणून मोटारीचा सर्व धंदा प्रांतिक सरकारनें आपल्या मालकीचाच बनविला पाहिजे. आगगाड्या व आगबोटी हे धंदे राष्ट्रीय सरकारच्या मालकीचे झाले पाहिजेत. तसेंच गांवच्या गरजा भागविणारे कारखाने गांवच्या मालकीचे बनतील. प्रांताला माल पुरविणाऱ्या गिरण्या व मोठे कारखाने आणि ठोकळ व्यापार यांच्यावर प्रांतिक सरकारची मालकी व नियंत्रण असलें पाहिजे. प्रांताबाहेर व देशाबाहेर जाणाऱ्या व बाहेरून आंत येणाऱ्या मालाची वाहतुक व व्यापार यांवर राष्ट्रीय सरकारचें स्वामित्व व नियंत्रण राहिलें पाहिजे. असें केल्यावांचून जनतेच्या गरजांप्रमाणें मालाची निपज व ने-आण होणार नाहीं. तसेंच ऐतखाऊ मालकवर्ग नष्ट झाल्यावांचून जनतेचें रक्तशोषण थांबणार नाहीं. म्हणून कारखानदार, जमीनदार, सावकार व दुकानदार हे वर्ग नष्ट करणें हें हिंदी संघराज्याचें आद्य कर्तव्य समजलें पाहिजे. हें कार्य सत्याग्रहाच्या निःशस्त्र क्रांतीनें निश्चित होऊं शकेल. यालाच आम्ही सत्याग्रही समाजवाद असें म्हणतों.

## पाकिस्तानांतहि याच धर्माचा प्रसार केला पाहिजे

हिंदी संघराज्यांप्रमाणें पाकिस्तानांतहि याच सत्याग्रही समाजवादाचा प्रसार केला तर सर्व धर्मभेद लयास जातील आणि ज्या धर्मभेदामुळें एका हिंदुस्थानचे दोन तुकडे आज झाले आहेत, ते दोन तुकडे पुनः एकरूप होतील. हे दोन तुकडे राष्ट्रसभेनें स्वयंनिर्णयाचें व लोकशाहीचें तत्त्व मान्य केलें म्हणून झाले आहेत, असा खोटा प्रचार हिंदुसभावादी करीत आहेत. पण हिंदुस्थानचे दोन तुकडे पाडण्यास स्वयंनिर्णय किंवा लोकशाही हीं तत्त्वें कारण झालीं नसून हिंदु-राष्ट्रवाद आणि मुस्लिम-राष्ट्रवाद ही राष्ट्रभेदी व धर्मभेदी तत्त्वज्ञानें कारण झालीं आहेत. जोंपर्यंत हीं धर्मभेदी व राष्ट्रभेदी तत्त्वज्ञानें जिवंत आहेत, तोंपर्यंत द्विखंड हिंदुस्थान केव्हांहि अखंड होणार नाहीं. हे हिंदु-राष्ट्रवादी व मुस्लीम-राष्ट्रवादी आपल्या संघराज्यांत हिंदू व मुसलमान राजांनीं सामील होऊं नये असाहि राष्ट्रविघातक प्रचार करीत आहेत. या प्रचारामुळें देशांतील लोकशाहीचा व अखंडत्वाचा घात होत आहे. हें ओळखून सर्व धर्म एकच आहेत असं सांगणारें सत्याग्रही तत्त्वज्ञान आणि सर्व जातिभेद व वर्गभेद नष्ट केले पाहिजेत असें सांगणारें समाजवादी

तत्त्वज्ञान यांचा फैलाव दोन राज्यातील जनतेंत सत्याग्रही समाजवाद्यांनीं केला पाहिजे. हें करण्यासाठींच म. गांधी हे आतां यापुढील आपलें आयुष्य पाकिस्तानांतच मी घालविणार असें म्हणत आहेत. ज्या मुसलमानप्रधान विभागांत सत्याग्रही समाजवादाचा प्रसार अद्यापि पुरेसा झाला नव्हता, तेच प्रदेश आज अलग झाले आहेत. यापुढें हें कार्य करण्यासाठींच म. गांधी पाकिस्तानांत जात आहेत व त्यांच्या मागोमाग सत्याग्रही समाजवाद जाणार आहे. द्विखंड हिंदुस्थान अखंड करण्याचा हाच खरा मार्ग असून तो सत्याग्रही व समाजवादीच दाखवून देतील. हिंदु-मुस्लीम-राष्ट्रवादी धर्मभेद व जातिभेद माजवून पुनः या स्वतंत्र भारताचे अनेक खंड मात्र पाडतील. पण जनता त्यांच्यामागून केव्हांहि जाणार नाहीं अशी आमची खात्री आहे. हिंदी जनतेला आपल्या उद्धाराचा मार्ग राष्ट्रसभा व म. गांधी यांनीं दाखविला असून ती त्यांना व त्या मार्गाला केव्हांहि सोडणार नाहीं.

★

आचार्य शं. द. जावडेकर यांचे

# अभ्यसनीय ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १ | राजनीतिशास्त्रपरिचय | ३-०-० |
| २ | हिंदी राजकारणाचें स्वरूप | ०-८-० |
| ३ | राज्यशास्त्र-मीमांसा ( शिल्लक नाहीं ) | |
| ४ | आधुनिक भारत ( अद्ययावत् द्वितीयावृत्ति छापत आहे ) | |
| ५ | लोकशाही | १-८-० |
| ६ | आधुनिक राज्य-मीमांसा ( भाग १ व २ ) | २-८-० |
| ७ | अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र? ( द्वितीयावृत्ति ) | २-०-० |
| ८ | गांधीवाद | १-८-० |
| ९ | पुरोगामी साहित्य | २-०-० |
| १० | शास्त्रीय समाजवाद ( शिल्लक नाहीं ) | |
| ११ | हिंदु-मुसलमान-ऐक्य | ३-०-० |
| १२ | समाइक सहकारी स्वराज्य | ०-४-० |
| १३ | भारतीय क्रांति आणि राष्ट्रसभा | ०-१२-० |
| १४ | महाराष्ट्र आणि हिंदी राजकारण | १-०-० |
| १५ | महायुद्ध आणि राष्ट्रसभा | ०-६-० |
| १६ | लो. टिळक व म. गांधी | २-०-० |
| १७ | वाल्मिकी-आश्रमांतील प्रवचनें | १-०-० |

★

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला,
१२ टिळक रोड, पुणें २

# आमचें प्रकाशन

( शिल्लक नसलेल्या पुस्तकांची किंमत दिलेली नाहीं. )

* १-२ **सत्याचे प्रयोग** ( द्वितीयावृत्ति ) : म. गांधी
* ३ **खादी-मीमांसा** ( द्वितीयावृत्ति ) : वाळूभाई मेहता
 ४ **स्वराज्य-शिष्टाई** : म. गांधी
 ५ **संयम कीं स्वैराचार ?** ( खंड १ ला ) : म. गांधी
 ६ **हिंडलग्याचा प्रसाद** : काका कालेलकर
* ७ **हिंदु धर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना**
 लेखक : एस्. राधाकृष्णन्
* ८ **उपनिषदांतील दहा गोष्टी** ( तृतीयावृत्ति )
 लेखक : शंकरराव देव ०-१२-०
* ९ **विद्यार्थी जीवन** ( द्वितीयावृत्ति )
 लेखक : श्री. स. महाजन
*१० **फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास**
 लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर १-४-०
 ११ **कॉंग्रेसचा इतिहास** ( द्वितीयावृत्ति )
 लेखक : डॉ. पट्टाभिसीतारामय्या
 १२ **समाजवादच कां ?** ( द्वितीयावृत्ति )
 लेखक : जयप्रकाश नारायण २-०-०
 १३ **खानबंधू** : महादेवभाई देसाई
 १४ **जवाहरलाल नेहरू**: आत्मचरित्र (द्वितीयावृत्ति): पं. नेहरू १२-८-०
*१५ **विश्राम** ( चतुर्थावृत्ति ) : साने गुरुजी १-४-०
*१६ **भारतीय संस्कृति** ( चतुर्थावृत्ति ) : साने गुरुजी ३-०-०
 १७ **प्रसाददीक्षा** : म. गांधी
 १८ **भिल्ल साधु गुलामहाराज** : शं. वि. ठकार
*१९ **आधुनिक भारत** : आचार्य जावडेकर
*२० **हिमालयांतील प्रवास** ( तृतीयावृत्ति )
 लेखक : काका कालेलकर २-४-०

| | | |
|---|---|---|
| २१ | **गांधीजींचें विविध दर्शन** ( द्वितीयावृत्ति ) संकलनकार : एस्. राधाकृष्णन् | २-८-० |
| *२२ | **जिवंत व्रतोत्सव** : काका कालेलकर | |
| २३ | **गांधी-विचार-दोहन** : किशोरलाल मश्रूवाला | |
| २४ | **सत्याग्रही महाराष्ट्र** : प्रेमा कंटक | ३-०-० |
| *२५ | **अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र**? ( द्वितीयावृत्ति ) लेखक : जॉन रस्किन | २-०-० |
| *२६ | **जीवन-दर्शन** ( तृतीयावृत्ति ) लेखक : महाकवि खलिल जिब्रान | १-१२-० |
| २७ | **ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र** : जे. सी. कुमारअप्पा | |
| २८ | **बापू** : घनश्यामदास बिडला | १-८-० |
| २९ | **संस्कृतीचें भवितव्य** : एस्. राधाकृष्णन् | |
| ३० | **महात्मा गौतमबुद्ध** : ,, ,, | १-०-० |
| ३१ | **जीवन आणि साहित्य** : आचार्य स. ज. भागवत | २-८-० |
| ३२ | **प्राचीन साहित्य** : कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकुर | १-८-० |
| ३३ | **संयम कीं स्वैराचार**? ( खंड २ रा ) : म. गांधी | १-१२-० |
| ३४ | **हिंदु-मुसलमान-ऐक्य** : आचार्य जावडेकर | ३-०-० |
| ३५ | **गीताहृदय** ( तृतीयावृत्ति ) : साने गुरुजी | ०-१२-० |
| ३६ | **हिंदूंचें समाजकारण** : काका कालेलकर | २-४-० |
| ३७ | **द्विखंड हिंदुस्थान** : डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद | ११-०-० |
| ३८ | **कॉंग्रेस-कथा** ( द्वितीयावृत्ति ) : गो. आ. देशपांडे | ४-८-० |
| ३९ | **भगवान् बुद्धासाठीं** : शंकरराव देव | ३-८-० |
| ४० | **आचार्य कृपलानी** : निवडक लेख व भाषणें | ३-०-० |
| ४१ | **वाल्मिकी-आश्रमांतील प्रवचनें** : आचार्य जावडेकर | १-०-० |

* हीं पुस्तकें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील सरकारी विद्याखात्यांनीं शाळांतील वाचनालयांकरितां व बक्षिसांकरितां मंजूर केलीं आहेत.